# नवभारत

वर्ष ६ वें ] एप्रिल १९५३ [ अंक ७ वा



**किंमत १ रुपया**

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें

अंक सातवा

# नवभारत

एप्रिल

१९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर

का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# 'नवभारत', एप्रिल १९५३

## —लेखक-परिचय—

[ खालीं परिचय दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचे लेख या वर्षीच्या मागील अंकांत आले असून, त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

प्रा. गो. के. भट एम्. ए. पीएच्. डी.–अहमदाबाद येथील गुजरात कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक. 'प्रणय', 'गृहदाह', 'Preface to Mrichhakatika' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

('प्रताप.') श्री. गो. ल. जमदाडे एम्. ए.–लोणंद ('उ.सातारा') येथील 'मालोजीराजे विद्यालयां'त शिक्षक.

प्रा. रा. सी. देशपांडे—अमळनेर येथील प्रताप कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. गौरीश कैकिणी—गोकर्णजवळ बंकिकोड्ल येथील आनंदाश्रम हायस्कूलमध्यें शिक्षक. हे एक लोकप्रिय कन्नड लेखक असून, त्यांची 'ओलुमेय ओगटु' ('प्रेमाचें गूढ'), 'गंडु हेण्णु' ('स्त्री व पुरुष'), 'पाश्चिमद प्रतिभे' ('पाश्चात्त्य प्रतिभा'), 'मार्क्सवाद' इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

श्री. कृ. ना. फडके, बी. ए. एलूएल्. बी.—( पुणें ) महाराष्ट्रांतील प्रसिद्ध मार्क्सवादी कार्यकर्ते.

प्रा. द. रा. बेन्द्रे—सोलापूर येथील डी. ए. व्ही. कॉलेजमध्यें कानडीचे प्राध्यापक. कानडी भाषेंतील अग्रगण्य कवि व समीक्षक.

प्रा. नी. वि. सोवनी—पुणें येथील 'गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अँन्ड एकॉनॉमिक्स' या संस्थेचे उपप्राचार्य. यांना रॉकफेलर फाउंडेशनतर्फे शिष्यवृत्ति मिळून, ते अमेरिकेंत 'Economic Developments' या विषयाचा अभ्यास करून नुकतेच आले. 'Population Problem in India : A regional approach', 'International position of India's raw materials' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. प. वि. पटवर्धन एम्. ए. एलूएल्. बी.— पुणें येथील एंजिनिअरिंग कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

---

☞ पत्रव्यवहार—'नवभारता'च्या मार्चच्या अंकांत प्रा. स. वा. कोगेकर यांचा 'टिळक, गोखले व समाजकार्य' हा लेख आला आहे. त्यासंबंधीं आपला मतभेद व्यक्त करणारें प्रा. प्र. रा. दामले ( पुणें ) यांचें पत्र आलें आहे.—मार्चच्या अंकांत डॉ. सत्यपाल ठाकूर यांनीं 'कोल्हापूर जिल्ह्याचें सामाजिक दर्शन' या आपल्या लेखांत बाहुबली या गांवांतील विद्यालयांतील स्वच्छतेसंबंधीं जीं कांहीं विधानें केलीं आहेत, त्यांबद्दल मतभेद व्यक्त करणारें श्री. प्रे. द. शहा ( कारंजा ) यांचें पत्र आलें आहे.–ह्या दोन्हींहि पत्रांतील मजकूर प्रस्तुत एप्रिलच्या अंकांत स्थलाभावीं प्रसिद्ध करतां आला नाहीं. पुढील मेच्या अंकांत तीं पत्रें प्रसिद्ध करूं.—का. सं.

अनुक्रमणिका

प्रा. गोविन्द केशव भट

# 'मृच्छकटिकां'तील विनोद

## शूद्रकाचें असाधारण विनोदसामर्थ्य

संस्कृत नाटक हें अनेक संकेतांनीं लादलेलें आहे. संस्कृत नाट्यवाङ्मयाचा इतिहास पाहिला म्हणजे असें दिसून येतें कीं, या नाट्यसंकेतांना डावलण्यापेक्षां त्यांचा अक्षरशः आदर करण्याकडेच संस्कृत लेखकांची प्रवृत्ति वळलेली आहे. संस्कृत नाटकानें विदूषकाचें पात्र दिलें, परंतु या पात्राच्या चित्रणाचे नियम आणि त्यांचा प्रत्यक्ष अवलंब यांनीं या पात्राला केवळ ठोकळेबाज स्वरूप आलें. विदूषकाचा विकास थांबला आणि त्याच्या विनोदांतला प्राण नाहींसा झाला. जो कांहीं विनोद विदूषकाच्या द्वारें नाट्यलेखनांत अवतरला तो या पात्रानें शारीरिक व्यंग आणि मूर्खपणाचे आचार व विचार या खालच्या पातळीवर थबकला. विनोदाचें स्वरूप बहुतांशीं पोकळ शाब्दिक कोटयांमध्यें सामावलें. कांहीं लेखकांनीं विनोदाची वाटच सोडली. एरव्हीं अतिशय प्रभावशाली नाट्यलेखन करणारा भवभूतीसारखा नाटककार विनोदाला पारखा राहिला. या गोष्टीचा एक न कळत परिणाम असा झाला कीं, भीषणगंभीर शोकान्तिका नाट्यलेखनांतून कटाक्षानें वगळूनहि संस्कृत नाटक गंभीरच राहिलें आणि खऱ्या सुखान्तिकेचा रुचकर खेळकरपणा त्याच्यांत यावा तसा आलाच नाहीं! कालिदासासारखा एखादाच खेळकर नाटककार निघाला कीं, ज्यानें नाट्यलेखनाचे संकेत पाळूनहि विदूषकाच्या पात्रांत प्राण भरला, प्रियंवदेच्या घरगुती भाषणांत विनोदबुद्धीची तिखट चमक आणली आणि पित्याला न ओळखणाऱ्या मोहक सर्वदमनांत शैशवाची मस्ती, निर्भयपणा आणि अभावित विनोद यांच्या चित्ताकर्षक छटा खुलविल्या. तसें पाहिलें तर भास हाच एक नाटककार असा आहे कीं, ज्याच्यांत खेळकरपणाची मुग्ध चमक आहे, निर्मितीची स्वतंत्र प्रज्ञा आहे. शूद्रकाचें साम्य भासाशीं आहे. हंसत-खेळत, चिमटे घेत, टीका करीत, दिपवीत आणि मानवी दोषांची निरागस थट्टा करीत, जीवन-नाटकांत मुक्तपणें संचार करणारें जें चैतन्य भासाच्या ठायीं जन्मलें असावें त्याचा विलास शूद्रकांतच पाहावयाला सांपडेल. मजेदार सट्टेबाजाच्या नजरेनें संपत्तीच्या नश्वरतेकडे पाहून डोळे मिचकावण्याची कला शूद्रकांत दिसून येईल. विदूषकाची टोपी डोक्यावर चढवून, उपहास, उपरोध आणि परिहास यांचीं शस्त्रें शहाणपणानें परजून, लोकांवर खेळकर वार करणें आणि इतरांची अशी मुक्त थट्टा करीत असतांना स्वतःच्या मूर्खपणालाहि मनमोकळेपणानें हंसण्याची निरागस विनोदवृत्ति प्रकट करणें शूद्रकालाच साधलें आहे. आणि चेहऱ्यावर विनोदाचें हांसूं पसरवितांना डोळ्यांत पाणी आणण्याची करामतहि शूद्रकानें दाखविलेली आहे. मुक्तपणें हंसविण्याच्या प्रयत्नांत विनोदाला खालच्या पातळीवर येऊं न देण्याचें खऱ्याखुऱ्या सुखात्मिकेचें जें मौलिक तत्त्व आहे त्याची जाणीव शूद्रकाला जेवढी आहे तेवढी इतर लेखकांनीं दाखविली आहे असें दिसत नाहीं.

'मृच्छकटिका'चीं जीं अनेक अनन्यसाधारण वैशिष्ट्यें आहेत त्यांत सुखकर आणि नावीन्यपूर्ण विनोदाचा वांटा बराच मोठा आहे. हा विनोद शिळा नाहीं कीं अगदीं ठोकळेबाज नाहीं; सर्व नाटकभर त्याचा दरवळ पसरलेला आहे. तो अग्निकणा-








प्रमाणें चमकणारा आहे. त्याची धार जितकी मोहक आहे तितकेंच त्याच्या विविधतेचें वैभव मनाला प्रसन्न करणारें आहे.

## शाब्दिक विनोद

'मृच्छकटिकां'त शाब्दिक विनोद अर्थातच आहे, जो कोट्या आणि सूक्ति यांच्यामध्यें दिसून येतो. वसन्तसेनेचा चेट मैत्रेयाला म्हणतो, " परिवर्त्य भण ", " पादौ परिवर्त्य भण " आणि पाद म्हणजे शब्दांची उलटापालट करण्याऐवजीं मैत्रेय आपलें पाद म्हणजे पाय फिरवून स्वत:भोंवतीं गरगरा फिरतो. तसेंच, भिक्षूच्या " उवाशक ", " तुमम् धण्णे तुमम् पुण्णे " या शब्दांचा 'न्हावी, नास्तिक, डबकें, कुंभार' इत्यादि अर्थ करून शकार त्याच्यावर चिडतो. या दोन्ही ठिकाणचा विनोद शाब्दिक कोट्यांत आहे. आणि शकाराच्या बाबतींत तर, अर्थाचे संकेत समजले नाहींत तर, तो विनोदहि समजण्यासारखा नाहीं. शाब्दिक विनोदाचें स्वरूप बहुतांशीं श्लेषात्मक असलें तरी कांहीं वेळेस मात्र तो उखाण्याच्या रूपानें प्रकट झालेला दिसतो. उदाहरण म्हणून, चेट वसंतसेनेच्या आगमनाची वार्ता जें कोडें टाकून देतो तें पाहावें: " आंब्याला मोहर केव्हां येतो ? " ( वसंत ). " समृद्ध शहरांचें रक्षण कोण करतें ? " ( सेना ). ह्याच उखाण्याच्या सूचक पद्धतीचा अवलंब करून सहाव्या अंकांत चन्दनक आणि वीरक एकमेकांची जात काढून भांडतात.

शकार जो अभावित विनोद पिकवितो त्याचेंहि स्वरूप भाषेची कसरत हेंच आहे. शकाराच्या विनोदाच्या तीन तऱ्हा आहेत. शकाराच्या शब्दप्रयोगांत 'श' या वर्णाचें बाहुल्य आहे. यामुळेंच त्याचें खरें नांव संस्थानक असें असूनहि त्याला शकार हें टोपणनांव मिळालें आहे. शकाराची दुसरी तऱ्हा म्हणजे समानार्थी शब्दांचा एकाच वाक्यांत प्रयोग. स्वतःला मोठ्या अभिमानानें त्यानें लावून घेतलेली पदवी " वरपुरुषमनुष्य " किंवा केसांचा उल्लेख करतांना " केशेषु बालेषु शिरोरुहेषु " हा प्रयोग किंवा वसन्तसेनेला बहाल केलेलीं दहा नांवें हीं या तऱ्हेचीं उदाहरणें होत. शकाराचा तिसरा आचरटपणा म्हणजे पुराणकथें तलीं त्यानें उलटींपालटीं केलेलीं नातीं. शकारानें जोडलेले हे संबंध हास्यास्पद तर आहेतच, पण जेव्हां तो सुभद्रेला विश्वावसूची बहीण करतो किंवा रावणाला कुंतीला पळवून न्यायला लावतो किंवा द्रौपदी रामाला भिऊन पळाली असें सांगतो, तेव्हां पौराणिक संबंधांच्या या मोडतोडींत हास्याबरोबर अर्वाच्यपणाहि जाणवल्यावांचून राहत नाहीं !

## विनोदबुद्धींतील चमक

बुद्धीची चमक असलेल्या शाब्दिक सूक्ती या नाटकांत पुष्कळ आहेत आणि त्या मैत्रेयाच्या उद्‌गारांत प्रामुख्यानें दिसून येतात : गायकांप्रमाणें उंच आणि बारीक आवाजांत गाणारा पुरुष आणि वेदमंत्रांचें पठन करणारी स्त्री यांची तुलना त्यानें नाकांत नवी वेसण घातलेल्या नव्या गाईच्या सुसकाऱ्यांशीं केली आहे ! वेश्या म्हणजे जोड्यांत अडकलेला खडा, सहजगत्या निघायचा नाहीं ! वसन्तसेनेच्या लठ्ठ आईची मैत्रेयानें केलेली थट्टा बेसुमार आहे. तिच्याकडे पाहून तो उघडपणें म्हणतो : " कवडी किंमतीची डाकीण ही, केवढं मोठं पोट आहे हिचं ! का हो, महादेवाची पिंडी जशी अगोदर आंत ठेवून मग मंदिराच्या भिंती बांधतात तसं हिला अगोदर घरांत बसवून मगचं दारें केलीं असलीं पाहिजेत, नाहीं ? ", " ही बया मेली तर हजार कोल्ह्यांचं तरी पोट भरेल ! ". मैत्रेयाला बरोबर घेऊन चलणारी दासी जेव्हां या थट्टेनें रागावून त्याला सांगते कीं, माताजी चातुर्थिक तापानें आजारी आहेत, तेव्हां मैत्रेय पुन्हां निर्दय थट्टा करीत म्हणतो : " देवा चातुर्थिक तापा, या गरीब ब्राह्मणावर तुझी कृपादृष्टि वळव कीं ! ". पांची बोटांत आंगठ्या घालून झगमग करीत चालणारा वसन्तसेनेचा भाऊ पाहिल्यावर मैत्रेय उद्‌गारतो, " का हो, किती पुण्य केलं म्हणजे माणूस वसन्तसेनेचा भाऊ होतो ? ". वेश्या आणि त्यांचें जीवन यांची थट्टा करतांना मैत्रेयाची जीभ मुळींच अडखळत नाहीं हें खरें आहे. परंतु मैत्रेयाच्या उद्‌गारांत जाणत्या निरीक्षकाची प्रखर चमक आहे, हेंहि मान्य केलें पाहिजे.

मैत्रेयच नव्हे, इतर पात्रांच्या बोलण्यांतसुद्धां ही विनोदी चमक आहे. तोंडाला पाणी सुटेल








असें खाद्यपदार्थांचें रसभरित वर्णन नटी करते आणि जेव्हां सूत्रधार भाबडेपणानें विचारतो, " खरंच, हे सगळे पदार्थ आहेत आपल्या घरीं ? " तेव्हां ती चटकन् उत्तर देते, " आहेत तर ! दुकानांत ! " मैत्रेय चेटाची थट्टा करतांना दिसतो :

" चेट — मी तुझ्यापुढें कोडें टेवतों.

मैत्रेय — मी तुझ्या डोक्यावर पाय ठेवतों ! "

शकाराच्या चेटालासुद्धां विनोदबुद्धि आहे :

" शकार — बाळा स्थावरक चेटा, मी तुला सोन्याची कडीं देईन.

चेट — मी घालीन हातांत !

शकार — तुला सोन्याचा चौरंग देईन.

चेट — मी बसेन त्याच्यावर कीं ! "

विटाची भीति दूर करण्यासाठीं शकार जें उत्तर देतो त्यांत अशीच अभावित चमक प्रकटली आहे. वसंतसेनेचा खून करण्याचा प्रस्ताव ऐकून अंगावर शहारे आलेला विट विचारतो, " असं कृत्य केलं तर परलोकाची नदी मी कशा तरून जाणार ? " शकार चट्दिशीं म्हणतो, " मी देईन ना होडी तुला ! "

नाटकाच्या शेवटीं आपल्या उदार स्वभावाला अनुसरून शकाराला अभय देण्याच्या उद्देशानें चारुदत्त म्हणतो, " आपल्याला शरण आलेल्या शत्रूचा वध शस्त्रांनीं करणें उचित नव्हे. " शर्विलक हजरजबाबीपणानें उद्गारतो, " बरोबर आहे ! त्याला कुत्रीं फाडून खाऊं देत ! "

## स्वभावनिष्ठ विनोद

शब्दनिष्ठ विनोदापेक्षां स्वभावनिष्ठ विनोदाची तऱ्हा आणि पातळी वेगळी आहे. या विनोदाचें नेहमींचें रूप म्हणजे विदूषकाचें पात्र. मैत्रेयाचा बराचसा विनोद त्याच्या कुरूपपणावर आणि त्याच्या भित्रेपणावर आधारलेला आहे. त्याचें डोकें कावळ्याच्या पायासारखें किंवा त्याच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे उंटाच्या गुडघ्यासारखें आहे. ही विकृति हास्यास्पद आहे. मैत्रेय इतका भित्रा आहे कीं, दिवा आणि रदनिकेसारखी एक स्त्री सोबतीला असल्यावांचून संध्याकाळीं दाराच्या बाहेर पाऊल टाकण्याची त्याची तयारी नाहीं ! चारुदत्ताच्या घरीं चोरी होते तेव्हां त्याची उडालेली तिरपीट पाहण्यासारखी आहे. तो घाबरटपणानें विचारतो, " काय ? चोराला भोंक पाडून भिंत पळाली ? " मैत्रेयाचा खादाडपणा हाहि विनोदाचा एक भाग आहे. पूर्वीच्या वैभवाची उदास आठवण करीत तो ' बाजारांत चरणाऱ्या बैला 'ची जी उपमा स्वतःला देतो ती या प्रकारांतली आहे. वसंतसेनेच्या घरीं त्याला कोणी ' या, बसा ' म्हटलें नाहीं, पाण्याचा पेलाहि पुढें केला नाहीं, म्हणून त्याला जो सात्त्विक संताप येतो त्याचें मूळ या खाद्यभक्तींत आहे. परंतु मैत्रेयाचा विनोद असा उथळ आणि ठराविक नाहीं. त्याच्या बेफाट जिभेंत विलक्षण खोंच आहे आणि त्याच्या शब्दांमागें सूक्ष्म निरीक्षण आहे. मैत्रेयानें शाब्दिक विनोद केला किंवा वेडगळपणानें हास्य निर्माण केलें तरी त्याच्या विनोदाची शक्ति स्पष्टवक्तेपणा, उपरोध आणि उपहास यांच्यांत आहे. स्पष्टवक्तेपणाचाच विचार केला तर मैत्रेयाच्या जिभेला हाड नाहीं असेंच दिसून येईल. वसंतसेनेचें अफाट वैभव पाहून त्याला प्रथम वाटतें कीं, तिचा समुद्रावर मोठा व्यापार चालत असावा. पण लगेच शहाणपणाचा आव आणून तो म्हणतो, " खरंच ! मदनाच्या समुद्रांत प्रेमाच्या स्वच्छ पाण्यावर तरंगणारीं तुमचीं मादक शरीरं म्हणजेच तुमचीं मनोहर जहाजं ! ". वादळाच्या रात्रीं वसंतसेना जेव्हां चारुदत्ताच्या घरीं येते तेव्हां तो सर्वांच्या देखत तिच्या दासीला म्हणतो, "आज रात्रीं इथंच झोपायचा विचार दिसतो आहे तुमचा!"

शकाराच्या बोलण्या-चालण्यांत चांगलाच अभावित विनोद प्रकट झाला आहे. सर्वसाधारण दुष्ट माणसाप्रमाणें शकार भीरु आहे. त्याला ' मनुष्या 'ची भीति वाटते, ' राक्षसी 'ची वाटते. आणि न्यायालयांत त्याच्या चेहऱ्याचा रंग उडतो, तो काळवंडतो, त्याला दरदरून घाम सुटतो. जेव्हां विट आपली तलवार उपसतो तेव्हां तो विचारतो, " का रे, स्यालास काय ? ". पहिल्या आणि आठव्या अंकांत वसन्तसेनेचें प्रणयाराधन करण्याचे त्याचे प्रयत्न जितके वेडगळपणाचे तितकेच हास्यास्पद आहेत. त्याची अज्ञानमूलक शेखी गंमतीची आहे. त्याचा भाषेचा आणि












पौराणिक उल्लेखांचा विक्रम अद्वितीय आहे. त्याच्या मूर्खपणालाहि सीमा नाहीं. चेट गाडी घेऊन पुष्पकरंडक उद्यानांत येऊन पोहोंचतो तेव्हां तो विचारतो, " चेट आला ? गाडी आली ? चेट आणि गाडी दोघेहि आले ? ". त्याचा गायनाचा विक्रम असाच घृणा आणि हास्य उत्पन्न करणारा आहे.—आणि वध्यस्थानाकडे जाणारी मिरवणूक पाहून तो उद्‌गारतो, " हा दरिद्री चारुदत्त मरायला निघाला तर एवढी लोकांची गर्दी जमली; मग आमच्यासारखा अत्युत्कृष्ट, उत्कृष्ट मनुष्य मरायला नेला जाईल तेव्हां किती लोक जमतील ! हाः हाः ! ". शकाराच्या या उद्‌गारांशीं कोणीहि हसत खेळत सहमत होईल !

शकाराचा विनोद अभावित आहे खरा; परंतु त्या विनोदाचा धर्म मात्र भीषण, भयंकर आहे. वसंतसेनेचा गळा दाबून तिला मारल्यानंतर थोड्याच वेळांत अगदीं थंड, निर्विकार मनानें तो विटाला म्हणतो, " चल गड्या, आपण तलावांत खेळूं या ! ". नाटकाच्या शेवटीं त्याच्या कृष्ण कृत्यांचा परिस्फोट झाल्यावर वसन्तसेनेजवळ प्रणययाचना करतांना त्यानें काढलेले उद्‌गार हंसूं आणणारे असले तरी असेच भीषण आहेत. तो म्हणतो, " अग गर्भदासीच्या मुली, मी पुन्हां तुझा खून नाहीं करणार ! वांचव मला ! "

मैत्रेयाच्या विनोदांत खोंचदारपणा आणि कांहीं वेळेस अपरिचित संकेत असतील, शकाराच्या विनोदांत हास्यास्पदता आणि भीषणता असेल, तर दर्दुराच्या विनोदांत मात्र सुखकर खेळकरपणाशिवाय दुसरा कोणताच धर्म नाहीं. फांसे खेळण्यांत दर्दुराचें सर्वस्व हरपलें आहे. परंतु या उडाणटप्पू पात्राविषयीं एक गंमतीचें आकर्षण वाटतें. आलेल्या दारिद्र्यानें त्याचें जुगाराचें प्रेम ओसरलें नाहीं कीं त्याच्या वृत्तींत आंबटपणा आलेला नाहीं. ज्या द्यूतानें त्याला आपल्या आयुष्यांत सुख आणि दुःख या दोहोंचीं शिखरें दाखविलीं त्या द्यूताबद्दल बोलतांना अजूनहि त्याच्या उद्‌गारांत खेळकरपणा नाचतो आहे. तो म्हणतो, " द्यूत म्हणजे सिंहासन नसलेलें राज्यच ! ". खाकेंत घडी करून ठेवलेलें आपलें फाटकें वस्त्र काढून त्याच्या दुर्दशेकडे तो सहानुभूतीच्या नजरेनें पाहूं शकतो : " या वस्त्राचीं सुतं न् सुतं निघालीं आहेत. शेंकडों भोंकं याला शोभा देत आहेत. पांघरायला याचा कांहींच उपयोग नाहीं. याची घडी करून ठेवली म्हणजेच हें वस्त्र चांगलें खुलून दिसेल ! "

शर्विलकालाहि विनोदी दृष्टि आहे. आपल्या जानव्याचे विविध उपयोग तो मोठ्या मनोरंजक तऱ्हेनें वर्णन करून सांगतो. आणि चारुदत्ताचें घर फोडायला तो सरसावतो तो एखाद्या शास्त्रज्ञाच्या गांभीर्यानें, कलावंताच्या मुलायमपणानें ! 'मृच्छकटिका'च्या उपकथानकांतील हीं कांहीं पात्रें अतिशय मौजेचीं आहेत. त्यांची प्रेम करायला जशी तयारी आहे तसें रस्त्यांत मारामारी करायला किंवा राज्यक्रांतींत बंडखोरांच्या बाजूनें लढायलाहि ते एका पायावर तयार आहेत ! आणि हे सर्व धंदे करीत असतांना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या उंचीला कोठेंहि धक्का लागत नाहीं ! ह्या स्वभावचित्रणाची हीच तर मौज आहे. कारण यांच्या द्वारें प्रकट झालेला विनोद केवळ हंशा पिकविण्यासाठीं निर्माण झालेला नाहीं. यांचा विनोद म्हणजे जीवनाकडे पाहण्याची एक दृष्टि आहे. आयुष्यांतलीं दुःखें आणि भग्नता यांच्याशीं गंमतीनें डोळे मिचकावीत कसें झुंजावें या तत्त्वज्ञानाची ही एक 'शिक्षा' आहे !

## प्रसंगनिष्ठ विनोद

विनोदाचा एक तिसरा प्रकार आहे : प्रसंगनिष्ठ विनोद. या तऱ्हेच्या विनोदाला भाषेची आडकाठी कधीं येत नाहीं. म्हणूनच असल्या विनोदाचें आकर्षण सार्वत्रिक आहे. येथेंहि शूद्रकानें चांगली विविधता दर्शविली आहे. पांचव्या अंकांतील मैत्रेय व चेट यांच्यामधील संभाषणांत मैत्रेय आपल्या मूर्खपणानें स्वतःला जें हास्यास्पद करून घेतो तो प्रसंग किंवा शकाराचें प्रणयाराधन ( ज्यांत प्रणययाचना आणि जबरदस्ती या दोहोंचा तो अवलंब करतो )—ह्या दोन्ही प्रसंगांची गणना या तऱ्हेच्या विनोदांत होते. मात्र येथील विनोद फार्स किंवा प्रहसन या सदरांतच जमा करावयास हवा.








# ‘ मृच्छकटिकां ’तील विनोद

दुसऱ्या अंकांत एक गंमतीची घटना आहे. द्यूतांत हार खाऊन आणि कर्ज डोक्यावर घेऊन सभिकाच्या भीतीनें संवाहक रस्त्यांतून पळत सुटतो. द्यूतगृहाचा मालक सभिक आणि दुसरा एक द्यूतकर संवाहकाचा पाठलाग करतात. पाठलाग चुकविण्यासाठीं संवाहकानें योजलेले उपाय हंसू आणणारे आहेत. परंतु जेव्हां संवाहक उलट्या पावलांनीं चालून एका देवळांत शिरतो आणि आंतील मूर्तीच्या जागीं, मूर्तीचा पवित्रा घेऊन निश्चल उभा राहतो तेव्हां त्याच्या या हास्यास्पद प्रयत्नांचा कळस झालेला दिसतो ! सभिक आणि द्यूतकर देवळांत शिरतात. त्यांना अगोदरच संशय आलेला आहे. ते देवळांत द्यूत खेळायला प्रारंभ करतात. आणि खेळ जसा रंगतो तसें भान न राहून संवाहक एकदम पुढें होऊन आपला डाव असल्याची घोषणा करतो आणि नेमका सभिकाच्या हातीं सांपडतो ! सभिकानें योजिलेली युक्ति मानसशास्त्रदृष्ट्या अत्यंत आकर्षक आहे यांत शंकाच नाहीं. खरें म्हणजे हा सर्वच प्रसंग अतिशय गंमतीचा आहे. फक्त संवाहकाचा अननुभवी बालिशपणा लक्षांत घेतला म्हणजे या हास्यांतहि कारुण्याची छटा डोकावते. दर्दुरकाचा प्रवेश होतांच या प्रसंगाचें आणि विनोदाचेंहि रूप पालटतें. शाब्दिक भांडाभांडीनें सुरुवात होऊन हें प्रकरण गुद्दागुद्दी आणि प्रत्यक्ष डोळ्यांत धूळ फेंकण्यापर्यंत येऊन ठेपतें ! दर्दुरकाचा हा विक्रम पाहून खदखदा हंसूं न आलें तरच नवल. या सर्व प्रसंगाचा शेवटहि शूद्रकानें एक गंमतीची छटा देऊन केला आहे. दर्दुरकाच्या युक्तीनें संवाहक सुटतो आणि वसंतसेनेच्या घराचा आश्रय घेतो. सभिक आणि द्यूतकर वसंतसेनेच्या दारावर पहारा करीत उभे राहतात. दरम्यान वसंतसेना संवाहकाची सर्व हकीगत ऐकून त्याला कर्जमुक्त करण्यासाठीं हातांतली सोन्याची बांगडी काढून देते व आपल्या दासीला ती सभिकाला नेऊन द्यायला सांगते. दासी खालीं येते आणि दाराजवळ उभे असलेल्या सभिक-द्यूतकरांची चौकशी करते. पण ही वसंतसेनेची दासी बहुधा ‘ गिऱ्हाईक ’ गांठायला उतरली असावी अशी कल्पना करून घेऊन द्यूतकर तिला म्हणतो, “ बाई, मजजवळ पैसे नाहींत. दुसरीकडे जा ! ”

तिसऱ्या अंकांतील चोरीच्या प्रसंगांतहि शर्विलकाच्या सावधगिरीच्या हालचालींत आणि मैत्रेयाच्या झोपेंतल्या बरळण्यांत अशाच विनोदी छटा भरलेल्या आहेत. स्वतःच्या घाबरटपणानें मैत्रेय बरळतो, “ मित्रा, तुला गाई-ब्राह्मणांची शपथ आहे. हें सुवर्णभाण्डं तूं आपल्या ताब्यांत घे ! ” चारुदत्ताच्या घरांत कांहीं मिळत नाहीं हें पाहून शर्विलक परत फिरण्याच्या बेतांत असतो, तो मैत्रेयाचे हे शब्द ऐकून थबकतो; आणि जणूं कांहीं आपल्यालाच उद्देशून हें बोलणें आहे अशा आविर्भावानें म्हणतो, “ गाई-ब्राह्मणांची शपथ कशी मोडणार ? ” आणि मोठ्या गंभीरपणानें तो मैत्रेयाच्या हातांतून तें सुवर्णाचें भांडें घेतो !

सहाव्या अंकांतील चन्दनक आणि वीरक यांच्या भांडणांतून चांगलाच विनोद निर्माण होतो. प्रश्न असतो चारुदत्ताच्या गाडीची पाहणी करण्याचा. त्यांत आर्यकाला बसलेला पाहून चन्दनकाचें मन द्रवतें व तो त्याला साह्य करण्याचें ठरवितो. एवढ्यावरून त्याचें वीरकाशीं भांडण जुंपतें. प्रथम शाब्दिक लढाई सुरू होते, पण त्यांत ज्या एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या निघतात त्यांत परस्परांच्या जातीवर शिंतोडे उडविले जातात. भांडणाचा कळस होतो तो असा कीं, चन्दनक वीरकाला लत्ताप्रहार करतो ! एकानें कांहीं तरी खुसपट काढून दुसऱ्याला डिवचायचें आणि बेसुमार भडकवायचें असा हा भांडणाचा प्रकार आहे. चन्दनकानें या प्रकाराला जें नांव दिलें आहे तें ‘ कर्णाटकलहप्रयोग ’ हें होय ! या प्रसंगाचा संबंध एका महत्त्वाच्या घटनेशीं म्हणजे आर्यकाच्या रक्षणाशीं आहे. चन्दनक मुद्दामच आपण दाक्षिणात्य आहों हें सांगून आपल्या भाषेंत शब्दांचे उच्चार अस्पष्ट आणि त्यांचें लिंग अनियमित असल्याचा बहाणा करतो. आर्यकाला सुखरूपपणें चौकीपहारे ओलांडून निसटतां यावें यासाठींच चंदनकाची धडपड आहे. या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे या प्रसंगाचा विनोदी रंग नीट दिसून येईल. दोन गंभीर प्रसंगांमध्यें नाट्यदृष्ट्या










या खेळकर प्रसंगाची योजना शूद्रकानें मुद्दामच केली असली पाहिजे हें स्पष्ट आहे.

न्यायालयांत मैत्रेयाची आणि शकाराची जी मारामारी जुंपते त्या प्रसंगानेंहि असेंच मनमुराद हंसू लोटलें असतें परंतु येथील ही मारामारी दुसऱ्या व सहाव्या अंकांतील मारामारीपेक्षां निराळी आहे; तिच्यांत एक वेगळी खोली आहे. सैतानी अंतःकरणाच्या शकारानें दुष्ट कारवाई करून न्यायाची जी परवड काढली ती पाहून मैत्रेयाचें सात्त्विक रक्त उसळून येतें आणि 'शकाराच्या हृदयाप्रमाणेंच वक्र असलेला' आपला सोटा उंचावून मैत्रेय शकाराचें टाळकें शेकायला पुढें सरसावतो. परंतु सोटा उगारण्याकरितां मैत्रेयानें हात उंचावण्याचाच अवकाश, त्याच्या काखेंतलें अलंकारांचें गांठोडें खालीं पडतें आणि चारुदत्ताच्या मानेभोंवतीं खुनाच्या आरोपाचा फांस आवळला जातो. मैत्रेयाचें धैर्य पाहून हंसावें कीं त्याच्या या दुर्दैवी चुकीपुढें रडावें हें ठरविणें कठीण आहे ! या प्रसंगांत नकळत कारुण्य शिरलें आहे. मैत्रेयाचें अवसान पाहून आलेलें हंसू अचानकपणें अश्रूंच्या दरींत लुप्त होतें.

शेवटच्या अंकांत राजकीय क्रांति यशस्वी झाल्यानंतर आणि वसंतसेना रंगभूमीवर आल्यावर, कथानकाचा सारा रंगच पालटतो. स्मशानभूमीवर गोळा झालेला जनसमुदाय शकाराला सुळावर चढविण्याची घोषणा करून गरजतो. इतका वेळ चारुदत्ताच्या गळ्यांत असलेली तांबड्या फुलांची माळ वसंतसेना काढून घेते आणि शकाराच्या मानेभोंवतीं फेंकते. तीं तांबडीं फुलें धारण केलेला, थरथरा कांपणारा आणि प्राण वांचविण्यासाठीं याचना करणारा शकार मूर्तिमंत वध्य पशूसारखा दिसतो. सर्व अनर्थाचें मूळ असलेल्या शकाराची ही अवस्था पाहून प्रेक्षकांना कांहीं वेळ तर खासच समाधान लाभतें. त्यांतच जेव्हां शकार आपले प्राण वांचविण्यासाठीं वसंतसेनेच्या पाया पडतो आणि गंभीरपणें आश्वासन देतो कीं, "मी पुन्हां तुझा खून करणार नाहीं !" त्या वेळीं सर्व सभागृह कोसळल्याशिवाय राहात नाहीं ! मात्र, या कडेलोट हास्यांत मागील भीषण प्रसंगाची स्मृति आहे हें आपण विसरूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें सर्व प्रसंग पालटल्यावर चारुदत्त वध्यमालेला विवाहमाला म्हणतो, वध्यसमयींचा पोशाख लग्नाचा पोशाख म्हणून आणि वध्यपटहाचें विवाहप्रसंगींचें मंगल संगीत म्हणून वर्णन करतो त्या वेळींहि प्रेक्षकांना मनमोकळेपणानें हंसणें कठीणच आहे. ह्या हास्यालाहि भीषणतेची कडा आहे.

### हृद्य विनोदाचा स्रोत

परंतु 'मृच्छकटिकां'त अत्यंत हृद्य अशा विनोदाचा एक स्रोत आहे. दहाव्या अंकात चारुदत्ताला ठार मारण्यासाठीं चाण्डाल हात वर उचलतो आणि एकाएकीं थांबून आपल्या बापाविषयीं एक चुटका सांगायला सुरुवात करतो. त्याच्या मृत बापानें त्याला शेवटचें म्हणून सांगितलें आहे कीं, गुन्हेगाराला मारण्यापूर्वीं जरा थांबावें कारण कांहीं अचानक योग जमून येऊन गुन्हेगार मृत्यूच्या मुखांतूनहि परत येण्याचा संभव असतो ! चाण्डालाचें हें थांबणें जितकें अनपेक्षित तितकें गंमतीचें पण आहे. आणि शिवाय त्यांत पुढील घटनेची नाट्यसूचना आहे ती आहेच. —अशा हृद्य विनोदाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे चौथ्या अंकांत शूद्रकानें वर्णिलेली चित्ताकर्षक घटना. शर्विलकानें चोरलेले अलंकार म्हणजे वसंतसेनेनें चारुदत्ताच्या घरीं ठेव म्हणून जे ठेवले होते तेच. अलंकार पाहतांच मदनिका तत्काळ ते ओळखते. वसंतसेनेला चारुदत्ताविषयीं किती प्रेम वाटतें याची मदनिकेला पूर्ण कल्पना आहे. शिवाय, वसंतसेनेनेच स्वतःचे दागिने तिला देऊन त्यांच्या मोबदल्यांत मदनिकेनें आपलें स्वातंत्र्य विकत घ्यायचें ही भूमिकाच मुळीं चमत्कारिक आणि संकोच उत्पन्न करणारी. हें सर्व लक्षांत घेतल्यावर आपण चारुदत्ताकडून अलंकार परत करण्यासाठीं आलों आहों अशी भूमिका घेऊन शर्विलकानें ते अलंकार वसंतसेनेला सादर करावेत, असा सल्ला मदनिका देते. आतां मौज अशी आहे कीं, या दोघां प्रेमिकांचें हें सारें संभाषण योगायोगानें वसंतसेनेला ऐकायला मिळालें आहे. जेव्हां हें युग्म वसंतसेनेच्या समोर येतें तेव्हां वसंतसेना गंभीरपणें

## 'मृच्छकटिका'तील विनोद

ते अलंकार घेऊन म्हणते, "चारुदत्तानें मला अगोदरच सांगून ठेवलं होतं कीं, जो हे अलंकार परत करायला येईल त्याचें लग्न मदनिकेशीं लावून द्यावें !" या प्रसंगांतील हृद्य नाट्यपूर्ण उपरोध, प्रेमिकांची केलेली गंमतीची फजिती, आपलें रहस्य उघड झालें म्हणून शर्विलकाला वाटणारा संकोच, आपल्या मालकिणीवरील प्रेमामुळें स्वतःचें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याची एकुलती एक संधि गमावून बसायला तयार झालेल्या मदनिकेची उच्च भक्ति आणि कर्तव्यनिष्ठा आणि वसंतसेनेचें सहज औदार्य— या सर्व विशेषांनीं भरलेला हा प्रसंग शूद्रकाच्या हृद्य कलेचा एक अपूर्व नमुना आहे, हें कोणालाहि मान्य व्हावें.

'मृच्छकटिका'च्या आपल्या सुंदर प्रस्तावनेंत डॉ. रायडर यांनीं सनमोकळेपणानें म्हटलें आहे : "शूद्रकाचा विनोद सर्व सप्तकांतून फिरतांना दिसतो. त्यांत भीषणता आहे तशी प्रहसनवजा थट्टा आहे; खोचक टीका आहे तशी विलक्षणता आहे. या विनोदाची विविधता आणि धार अशी आहे कीं, पाश्चिमेंतील कोणत्याहि सर्वश्रेष्ठ विनोदी नाटककाराशीं शूद्रकराजाची तुलना केली तरी त्याला वैगुण्य येणें शक्य नाहीं."

---

## वसुंधरे

वसुंधरे, तूं अमुची आई
वसुंधरे, तूं अमुचें जीवन
तुझ्याच आधारानें जगती
प्राणिमात्र हे जीवन घेउन.

कुणी म्हणूं दे तुजला माती
मीहि सांगतों त्यांना 'मा' ती
कुशींत तुझिया धोंडे, मोतीं
तुझींच रूपें अवघीं जगतीं.

जीव, भावना ब्रह्मेशाची
तुझी आकृती तुझीच कांति
असे प्रेरणा, वाणी प्रभुची
तुझीच भाषा चाले जगतीं.

बागबगीचे, फुलें, मुलें अन्
कोरिव लेणीं, महाल, डोंगर
तुझ्याच आधारानें सारें
नावीन्यानें खुलें चराचर !

नवे नवे उन्मेष पाहुनी
जातो माझा जीव भारुनी
परमेशाची घेउनी वाणी
तुझ्यावरी मी रचितों गाणीं.

—प्रताप

## कवी हो !

नसे आस वा आसरा तो अम्हांहि
पुरें आमुचें चित्तही भागतें
हृदीं आमुच्याहि बसे घाव, धारा
परी आंताचि आमुची वाहते,

हृदीं स्पंदतीं गूढ गीतें, परंतु
कधीं शब्द बाहेर येईच ना
हृदीं आमुच्याहि फुले प्रीतवेली
परी मूक या राहती भावना

हृदीं आमुच्याहि उठे घोर झंझा
हृदीं आमुच्या गर्जतीं वादळें
परी शांत अव्यक्त निःशब्दसे हे
मनींचे मनीं भाव हेलावले.

—असे वेदना तीच संवेदनाहि
वसे भावना तीच येथें उरीं
तुम्हा गोडसें गीत गुम्फावया ये
विरे आमुचें गीत अभ्यंतरीं.

—देवदत्त दाभोळकर

(चार्ल्स हॅमिल्टन सोर्ले यांच्या 'To Poets' या कवितेचा मुक्त अनुवाद)



अनुक्रमणिका

प्रा. एम्. एल्. दांतवाला

# हिंदुस्थानांतील जमीनमालकीचा ब्रिटिशपूर्व इतिहास

हिंदुस्थानांतील जमीनमालकीच्या प्रश्नाचा इतिहासदृष्ट्या अभ्यास करून निर्णय करणें म्हणजे एक गूढ कोडें उलगडण्याइतकेंच जिकिरीचें आहे. याबाबत जो कांहीं परंपरागत व बहुशः प्रत्यक्षा-प्रत्यक्ष अनुमानधक्क्यांवर आधारलेला पुरावा सांपडतो तो फार तुटक व तुटपुंजा आहे. त्यामुळें प्राचीनकालीन जमीनमालकीच्या प्रश्नासंबंधीं कोणतेंहि निःसंदिग्ध विधान करूं पाहणें धाडसाचेंच होय.

## जमीनमालकीच्या तीन अवस्था

जमिनीच्या मालकीच्या इतिहासांत तीन अवस्था दिसून येतात. पहिली अवस्था म्हणजे ज्या वेळीं जमीन ही सबंध जमातीची किंवा टोळीची असून तिच्यावर त्या सबंध जमातीची मालकी असते. या अवस्थेंत अर्थात् कांहीं जमिनीचे तुकडे लागवडीकरितां कांहीं कुटुंबांकडे सोंपविले जातात. कारण, नाहीं तर त्याशिवाय शेतीला लागणारे श्रम कोणी करणारच नाहीं. परंतु कांहीं काळानंतर मधूनमधून अशा सोंपविलेल्या जमिनींची परस्परांत अदलाबदल किंवा फेरवांटणी होत असते. याचाच अर्थ हा कीं, कोणतीहि जमीन कोणा कुटुंबाच्या मालकीची नसते.—पुढें पुढें व्यक्तीनें कसलेला जमिनीचा तुकडा मशागतीमुळें जेव्हां सुधारून सुपीक होतो तेव्हां तो तुकडा आपल्या कायमच्याच मालकीचा असावा अशी त्या विशिष्ट व्यक्तीला किंवा कुटुंबाला इच्छा होते. मग जमिनीची फेर-वांटणी करावयाचेंच रहित होतें. असें असलें तरी एवढें खरें कीं, कुटुंबप्रमुख हा व्यक्तिशः त्या जमिनीचा मालक होऊं शकत नाहीं. त्याला ती जमीन विकतां किंवा मृत्युपत्रानें दुसऱ्याला देतांहि येत नाहीं. अशा रीतीनें जमिनीची मालकी कुटुंबाकडे येते. जमीनमालकीच्या इतिहासांतील ही दुसरी अवस्था किंवा टप्पा होय.—पुढें पुढें आपल्या श्रमांचा व कौशल्याचा फायदा आपणा स्वतःलाच मिळावा ही जी माणसाची इच्छा, तिच्यामुळें जमिनीची मालकी व्यक्तीकडेच राहावी ही प्रवृत्ति बळावते. त्यामुळें कुटुंबें मोडतात व शेवटीं व्यक्तीच जमिनीची मालक बनते. ही तिसरी अवस्था असून हिचेंच प्रत्यंतर आपणांस युरोपमध्यें आढळून येतें.

हिंदुस्थानांतील जमीनमालकीच्या समस्येचा विचार करतांना साधारणतः दोन प्रश्न उद्भूत केले जातात : पहिला प्रश्न असा कीं, हिंदुस्थानांत सरकारकडे राज्यांतील सर्वच जमिनीची प्रत्यक्ष

---

आचार्य विनोबांनीं प्रवर्तिलेल्या भूदान-यज्ञाचें घोषवाक्य वा लक्ष्य 'सब भूमि गोपालकी' असें आहे.—ब्रिटिशांची अमदानी येथें सुरू होण्यापूर्वीं जमीन गांवच्या मालकीची असे, अशी आपली सर्वसाधारण समजूत आहे. या समजुतीचें प्रत्यक्ष इतिहासाच्या आधारें चिकित्सापूर्वक समीक्षण प्रा. एम्. एल्. दांतवाला यांनीं प्रस्तुत लेखांत केलें आहे, तें सध्यांच्या भूदान-यज्ञ-आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर वाचकांस विशेष उद्बोधक वाटेल. प्रस्तुत लेख 'नवभारता'-करितां मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा मराठी अनुवाद आहे—का. सं.

# हिंदुस्थानांतील जमीनमालकीचा ब्रिटिशपूर्व इतिहास

मालकी कधींकाळीं होती काय? या प्रश्नाचाच दुसरा पर्याय असा कीं, हिंदुस्थानांत कधीं काळीं जमीन-मालकी खाजगी व्यक्तींकडे होती काय?--दुसरा प्रश्न असा कीं, सरकारला जमिनीपासून जो रेव्हिन्यू मिळत असे तो खंडा-( rent )च्या रूपानें कीं करा-( tax )च्या रूपानें?--अर्थात् हा दुसरा प्रश्न केवळ तात्त्विक-( academic )च असल्यामुळें त्याचा विचार प्रस्तुत लेखांत कर्तव्य नाहीं.

## बेडन पॉवेलचा वादग्रस्त सिद्धांत

आतां पहिला जो प्रश्न कीं राज्यांतील सर्व जमीन सरकारच्या मालकीची होती काय, त्याबद्दल हिंदूंच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांमध्यें दोन मतप्रवाह आढळतात. त्यांपैकीं बेडन पॉवेलप्रभृति पंडितांचें मत असें कीं, जमिनीची मालकी पूर्वी राजाकडेच असे; शेतकरी फक्त जमिनीचें भाडें देणारे भाडेकरी होते. दुसरें मत असें कीं, शेतकरी हेच खरे जमिनीचे मालक असून, राजांचा हक्क कर वसूल करण्यापुरताच किंवा शेतमालाच्या कांहीं हिस्स्यापुरताच मर्यादित होता.--बेडन पॉवेलच्या मतावर अनेक भारतीय लेखकांनीं खरमरीत टीका केली आहे. ब्रिटिश राजकर्त्यांनीं आरंभीं जें केलें त्याचें समर्थन करायचा जो आग्रही अभिनिवेश बेडन पॉवेलच्या ठिकाणीं होता त्याच अभिनिवेशाचा पगडा त्याच्या या जमीनमालकीच्या प्रश्नाबाबतच्या मतावर पड-लेला आहे, हें सूक्ष्म विचारकाला दिसून येईल. बेडन पॉवेलला असें पटवून द्यायचें होतें कीं, ब्रिटिश कारकीर्दीला सुरुवात होण्यापूर्वी, हिंदुस्थानांतील पूर्वीचे राज्यकर्ते जे संस्थानिक त्यांनीं राज्यांतील जमिनीवर आपला सार्वत्रिक हक्क प्रस्थापित केला होता, म्हणून त्यांच्या पाठीमागून येणाऱ्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचा राज्यांतील सर्व जमिनीवर हक्क आपोआपच सिद्ध होतो.

बेडन पॉवेलनें हा सिद्धांत मांडला खरा; पण त्यालाच पुढें आढळून आलें कीं, प्राचीन हिंदु वा मुस्लिम धर्मशास्त्रकारांचा त्याला पुरावा सांपडत नाहीं. कारण त्यानेंच उद्धृत केलेल्या मनूच्या वचनाचा आशय असा आहे : " ज्यानें पहिल्यांदा जंगल साफ करून जमीन तयार केली त्याचीच ती जमीन. ज्यानें हरिणाला पहिल्यांदा बाण मारला त्याचाच तो हरिण ".-मुसलमानांची मूळ विचारसरणी अशी होती कीं, जित लोकांनीं इस्लामधर्म तरी स्वीकारावा किंवा गुलामगिरी वा मरण पत्करावें. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र जे जित लोक शेवटीं शरण आले व करभार ('खिराज') द्यायला तयार झाले त्यांच्या जमिनीवरील हक्कांत मुसलमानांनीं ढवळाढवळ केली नाहीं, त्यांच्या जमीनी काढून घेतल्या नाहींत. अशा रीतीनें आपल्या सिद्धान्ताला प्राचीन काळचा कांहींच आधार मिळत नाहीं हें पाहून, बेडन पॉवेलनें उत्तरकालीन राजांचा आधार घेतला आहे. तो म्हणतो, " माझ्या सिद्धान्ताला प्राचीन काळचा आधार मिळत नसेल, परंतु अलीकडील काळचा आधार मिळतोच. एतद्देशीय राजांचे खजिने नेहमींच रिते. त्यामुळें ते राजे शेतकऱ्यांकडून इतका भयंकर सारा वसूल करीत असत कीं, शेतकऱ्याला ती जमीनच नकोशी वाटे. शेतकऱ्याचा मालकी हक्कच नष्ट झाला होता. " शेवटीं बेडन पॉवेलनें असा निर्णय केला आहे कीं, ब्रिटिश राज्य स्थापन होण्यापूर्वी येथील संस्थानिक व त्यांचीं सरकारें ह्यांच्याकडे केवळ पडीत जमिनीचीच नव्हे तर सर्व यच्चयावत् जमिनीची मालकी होती. काश्मीर, सिमल्याजवळील डोंगराळ संस्थानें, होळकर, निझाम, यांनीं अशाच प्रकारचा आपला हक्क मांडला होता, असेंहि त्यानें आधारादाखल म्हटलें आहे.

## ग्रामसंस्थेचें प्राचीन काळापासूनचें स्वरूप

भारतीय लेखकांचें ब्रिटिशपूर्व जमीनमालकीच्या इतिहासाबाबत काय म्हणणें आहे हें पाहाणें उद्बोधक ठरेल. आरंभीं उल्लेख केलाच आहे कीं, जमीनमालकीच्या इतिहासांत तीन अवस्था आढळून येतात. पहिल्या अवस्थेंत जमीन सर्व जमातीची किंवा जमातीचाच एक भाग जी ग्रामसंस्था तिची असून, जमीनमालकी सामवायिक असते. पण डॉ. राधाकमल मुकर्जी यांच्या मतें, ही सामवायिक जमीनमालकी फक्त पडीत जमिनी, कुरणें, गुरचरणें यांच्यापुरतीच मर्यादित होती. राधाकमल मुकर्जी यांनीं बेडन पॉवेलशीं आपला मतभेद मात्र स्पष्ट

केला आहे. त्यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, बेडन पॉवेल म्हणतो त्याप्रमाणें हिंदुस्थानांत जमिनीची मालकी राजाकडे कधींच नव्हती.

सगळेच भारतीय लेखक महत्त्वपूर्ण म्हणून गणल्या गेलेल्या ग्रामसंस्थेची मुक्तकंठानें प्रशंसा करीत असतात. ग्रामसंस्थेचीं कर्तव्यें व महत्त्वाचीं वैशिष्ट्यें यांच्याविषयीं या सगळ्याच लेखकांच्या मतांत, तपशीलांत स्पष्टपणा नसला तरी, एकवाक्यता मात्र ठळकपणें दिसून येते. ग्रामसंस्थेचीं कर्तव्यें आणि वैशिष्ट्यें यांबद्दलची सर्वांचीच कल्पना स्थूल मानानें अशी आहे :

या हिंदू ग्रामसंस्था संपूर्णपणें सुसंघटित आणि स्वायत्त होत्या. पिढ्यानुपिढ्या व्यावसायिक कामें करणाऱ्या कारूनारूंच्या सहकार्यांचा लाभ या ग्रामसंस्थांना सारखा मिळत होता. ग्रामसंस्थेचा प्रमुख एक पाटील असे. गांवाचें एक पंचमंडळ असून त्याच्यामार्फत गांवांतील न्यायदान, कायदेकानू यांसारखीं कामें पार पडत. पोलिस पाटील पोलिसाचें व कुलकर्णी हिशेब ठेवण्याचें काम करी. सर्व पडीत जमीन ही ग्रामसंस्थेच्या मालकीची मानली जाई व तिची सर्व व्यवस्था ग्रामसंस्थेनें करावयाची असे. शेतीचीं कामें कशीं, कोणत्या क्रमानें व कोणी कोणी करावयाचीं याबद्दल नियम असत. लागवडीस योग्य अशा जमिनीचे निरनिराळे गट निरनिराळ्या कुटुंबांचे किंवा कुळांचे असत. पण कोणतीं पिकें काढावयाचीं, शेतीचीं कामें कोणत्या क्रमानें पार पाडावयाचीं यांबद्दल सर्व गांवाच्या संमतीनें एक व्यापक योजना आंखली जाई. जमिनीचा सारा किंवा राजाला द्यावयाचा उत्पन्नाचा हिस्सा सबंध गांवावर आंकारला जाई. गांवचा पाटील निरनिराळ्या कुळांवर तो वांटून देई. भरावयाच्या साऱ्याची कुळांमध्यें न्याय्य वांटणी करून, तो सरकारमध्यें भरावयाची जबाबदारी गांवाच्या पाटलाची असे.—ही ग्रामसंस्था मनूइतकी प्राचीन आहे. मध्यंतरीं किती राजघराणीं आलीं-गेलीं, साम्राज्यें जमीनदोस्त झालीं, तरी ही ग्रामसंस्था टिकून आहे. १८व्या शतकांत ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांनीं या ग्रामसंस्थेचें एक अद्वितीय व उत्कृष्ट संस्था म्हणून कौतुक केलें आहे.—अशा प्रकारें ग्रामसंस्थेच्या या वैशिष्ट्यपूर्ण गोष्टींचा सर्वच लेखकांनीं प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. वर वर्णन केलेल्या ग्रामसंस्थेच्या स्वरूपावरून हिंदुस्थानांतील खेड्यांची घटना इतिहासपूर्व मनूच्या काळींच नव्हे, तर अलीकडे १८ व्या शतकांतहि कशी होती, हें आपणांस ईस्ट इंडिया कंपनीच्या नौकरांनीं प्रत्यक्ष अवलोकन व चौकशी करून नमूद केलेल्या कागदपत्रांवरून प्रतीत होतें, असें आर्. सी. दत्त यांनीं ठासून मांडलें आहे.

थोडक्यांत निष्कर्ष सांगायचा झाला तर वादाचा मुख्य मुद्दा असा आहे : हिंदी लेखकांचें ठाम मत असें आहे कीं, " ब्रिटिश येथें येण्यापूर्वीं आपलीं खेडीं स्वायत्त होतीं, तेथें ग्रामपंचायती प्रचलित होत्या. राजाला फक्त गांवाच्या उत्पन्नाचा ठराविक भाग घेण्याचा अधिकार होता. एवढेंच नव्हे तर, या ग्रामसंस्था मुसलमान-कारकीर्दींतहि टिकून राहिल्या. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं मात्र त्या मोडून टाकल्या. " या उलट, ज्याचा वर उल्लेख केला आहे तें बेडन पॉवेलचें म्हणणें असें कीं, ब्रिटिशांपूर्वींच्या मुसलमान व एतद्देशीय राजांनीं राज्यांतील सर्वच जमिनीवर आपला मालकी हक्क प्रस्थापित केला होता.

## मुसलमानी अंमलांतील परिस्थिति

मुसलमानांच्या कारकीर्दींत खरोखरीं काय परिस्थिति होती हें थोडें खोलांत शिरून पाहिलें पाहिजे. तेराव्या शतकाच्या प्रारंभालाच मुसलमानी विजेत्यांनीं हिंदुस्थान आक्रमावयास सुरुवात केली. त्यांनीं आपल्या बरोबर जी स्वतःची कायदेपद्धति, राज्यकारभार, न्यायदानपद्धति ( jurisprudence ) आणली तिचीं वैशिष्ट्यें हिंदु-कायदे-पद्धतीपेक्षां निराळीं होती : ( १ ) हिंदु-कायदेपद्धतींत वंशपरंपरागत अधिकारांना स्थान होतें; मुसलमानांच्या कायदेपद्धतींत तें नव्हतें. ( २ ) मुसलमानांची कायदेपद्धति केंद्रवर्ती होती. हिंदु पद्धतींत ग्रामपंचायतींच्या स्वरूपानें विकेन्द्रीकरण झालें होतें. ( ३ ) हिंदु राजांच्या कारकीर्दींत शेतकरी कुळांकडून जो कर वसूल केला जाई, तो रद्द करून

मुसलमानांनीं नवीन नवीन वाढत्या प्रमाणांत करवसुलीची पद्धति सुरू केली. (४) मुसलमानांनीं ही करवसुली शेतमालाऐवजीं पैशाच्या रूपानें घेण्याचें सुरू केलें. अशा प्रकारें पैशाच्या रूपानें कर वसूल करणें म्हणजे कायद्याप्रमाणें मुसलमानांनीं शेतकऱ्यांच्या जमिनीवरील आपला अनियंत्रित मालकी हक्क शाबीत करणेंच होतें.

मुसलमान कायदेपद्धतीचीं हीं वैशिष्ट्यें जरी असलीं तरी ' उत्तरप्रदेश-जमीनदारी-विसर्जन-समिति '-( U. P. Zamindari Abolition Committee )चें म्हणणें असें कीं, हिंदुस्थानांतील जमीनमालकीच्या पद्धतींत मुसलमानांनीं कांहींहि ढवळाढवळ केली नाहीं; जमीनीशीं ज्यांचे हितसंबंध निगडित झाले आहेत अशांचे अधिकार, त्यांचे आपापसांतील संबंध, इतकेंच नव्हे तर त्यांचे राज्यसंस्थेशीं संबंध पूर्वींसारखेच मुसलमानी अमदानींतहि अबाधित चालू राहिले. हिंदू राज्यसंस्थेची जमीनमहसूल-व्यवस्था ( fiscal organization ) मुसलमान राज्यकर्त्यांनीं होती तशी स्वीकारली. मुसलमानांच्या अमदानींत शेवटीं शेवटीं उत्तरार्धांत, विशेषतः अकबरानें कांहीं बदल केले हें खरें; पण ते बदल देखील त्या वेळच्या प्रचलित पद्धतीवरच प्रामुख्यानें आधारलेले होते. त्या वेळचा राज्यकारभार पूर्वींपेक्षां अधिक गुंतागुंतीचा व केंद्रवर्ती झाल्यामुळें तदनुसार असे बदल होणें क्रमप्राप्तच होतें. परंतु अशा बदलांमुळें पूर्वींपासून चालत आलेल्या परंपरेंत विशेष खंड पडला किंवा शेतकऱ्यांच्या परंपरागत हक्कांत ढवळाढवळ झाली, असें मात्र घडलें नाहीं. ग्रामपंचायतींचीं ग्रामराज्यें पूर्वींच्याच जोमानें चालू होतीं. परंतु हळूहळू जे स्वतंत्र राजे आपणां स्वतःकरितां पूर्वीं खंड गोळा करीत असत ते मांडलिक झाल्यावर बादशहाकरितां खंडवसूली करूं लागले व त्यामुळें गांवच्या पाटलाचा आणि गांवाचाहि अधिकार थोडा कमी झाला. अशा रीतीनें शेतकरी व राज्यसंस्था या दोघांमध्यें एक जमीनदारांचा तिसराच मध्यस्थ अधिकारी वर्ग उत्पन्न होऊन तो आपला अधिकार गाजवूं लागला. जमीनदारी पद्धति अशासारख्या परिस्थितींतून निर्माण झाली असें म्हणतात. अर्थात्, या जमीनदारांचा अधिकार तसा स्पष्ट व निःसंदिग्ध नसला तरी त्यांचें प्रस्थ बरेंच वाढलेलें होतें. आतां तर ही गोष्ट सर्वमान्य झाली आहे कीं, जमीनदार हे तत्त्वतः व व्यवहारतः केवळ खंड-वसुली करणारे अधिकारी होते. जमिनीवर त्यांचा कायमचा अनुल्लंघनीय ( indefeasible ) हक्क होता असें कोणीच मानीत नव्हतें.

पडीत जमिनीच्या मालकीसंबंधानें विचार करतां कांहीं लेखकांना निर्विवादपणें असें वाटतें कीं, सर्व पडीत जमिनी सरकारच्या मालकीच्या असत. याउलट पडीत जमिनीची मशागत करून ती लागवडीस आणणाराचा तिच्यावरील हक्क प्रस्थापित होईपर्यंत, सर्व पडीत जमिनीवर समाजाची किंवा ग्रामपंचायतीची मालकी असे, या बाबतींत बहुतेकांचें ऐकमत्य आहे.

हिंदु व मुसलमान राजांच्या खंडवसूलीच्या प्रमाणांत फरक असे. हिंदु राजे उत्पन्नाचा एकषष्ठांश घेत तर मुसलमान राजे सबंध ( gross ) उत्पन्नाच्या अर्ध्या हिश्श्यापर्यंत खंड लादीत असत.

मुसलमानांच्या कारकीर्दींतील अत्यंत महत्त्वाची व चिरपरिणामी गोष्ट म्हणजे राजा तोडरमलची जमीनमहसूलपद्धति. या पद्धतीचा लक्षांत घेण्याजोगा विशेष म्हणजे हा कीं ती रयतवारी पद्धति होती. या पद्धतींत शेतकऱ्याच्या आड येणारे सर्व हक्क किंवा हितसंबंध तात्पुरते तरी बाजूला सारले जात. कित्येक प्रसंगीं राज्यसंस्थेचाच ताबा शिथिल होऊन रयतेची दाद सरकारच घेईनासें झालें व स्थानिक वरिष्ठ अधिकाऱ्यांचा जुलूम वेळप्रसंगीं रयतेला सहन करावा लागला, तरी शेवटीं सर्वच पौर्वात्य देशांतील कधींहि नष्ट न होणारा जो एकमेव असा कायदा म्हणजे समाजाची रूढि ( Custom )–तिचें रक्षण रयतेला शेवटीं मिळेच. राजा कितीहि जुलमी आला किंवा निघाला तरी तो ही परंपरागत रूढि धुडकावून लावूं शकत नसे. त्यानें कितीहि भरमसाट कर लादले तरी त्याला ' अमक्या कारणाकरितां हा जादा कर लादतों ' अशी कांहीं सबब सांगावीच लागे. या जादा करांच्या खालीं मूळ परंपरागत रूढीनें चालत आलेले जमीनमहसुलाचे दर लुप्त







न होतां टिकून राहिले हाच, मिलनें म्हटल्याप्रमाणें, रयतेचा हक्क अबाधित राहिल्याचा पुरावा होय. ' उत्तर-प्रदेश-जमीनदारी-विसर्जन-समिती 'नें आपल्या अहवालांत मुस्लिम कारकीर्दीतील जमीनमालकीविषयींच्या परिस्थितीबद्दल समारोप करतांना असें स्पष्ट म्हणून ठेवलें आहे कीं, मोंगल साम्राज्याचा ऱ्हास होऊन ब्रिटिशांचा अंमल चालू होईपर्यंतच्या मधल्या अंदाधुंदीच्या काळांत, सरदार-जमीनदारांकडून शेतकऱ्यांच्या हक्कांवर जरी आक्रमण करण्याचा प्रयत्न झाला असला, तरी त्यामुळें शेतकऱ्यांच्या जमीनमालकी-हक्कांत विशेष ढवळाढवळ झाली नाहीं.

### मिरास व उप्री

मराठेशाहींत जमीनमहसुलाची पद्धत कोणती होती तें पाहाणें उद्बोधक ठरेल. इतरांपेक्षां मराठ्यांच्या राज्यकारभाराचें सामान्य स्वरूप कसें होतें याविषयीं खात्रीचीं अनुमानें बांधण्यास, मराठेशाहीच्या अखेरीच्या काळांत एल्फिन्स्टनसारख्या ब्रिटिश अंमलदारांनीं केलेल्या वर्णनावरून भरपूर पुरावा मिळतो. मराठेशाहीच्या इतिहासाचें इतर पूर्वींच्या शाहींच्या मानानें हें वैशिष्ट्यच होय. १९ व्या शतकाच्या प्रारंभीं ब्रिटिशांच्या हातीं दक्खनचा बराच भाग आला, त्या वेळीं मिरास व उप्री या दोन जमीनधारा-पद्धती होत्या. मिरासमध्यें विशेष हक्क असत. मिरासदाराची जमीन ही त्याची खासगी मालमत्ता म्हणून मानली जात असे. त्याला ती आपल्या वारसाला देतां येत असे किंवा तिची कशीहि विल्हेवाट लावतां येत असे. शिवाय, मिरासदाराचा आपल्या जमिनीवर हक्क नेहमींच अभंग राही. मध्यंतरीं त्याच्या गैरहजेरींत त्याची जमीन दुसऱ्या कोणाच्या ताब्यांत जरी गेलेली असली, तरी त्या वहिवाटदाराकडून ती परत मिळविण्याचा मिरासदाराला हक्क असे. एका खेडेगांवांत जेवढे मिरासदार असत त्या सर्वांना जमीनमहसूल सरकारला भरण्याच्या बाबतींत, संयुक्तपणें व विभक्तपणें जबाबदार धरलें जाई. या मिराशीमुळें मिरासदारांना एक; सामाजिक वरचढ दर्जा प्राप्त होऊन ते समाजांतील उच्च कोटीचे, वरच्या दर्जातले समजले जात. याउलट उप्री म्हणजे सरकारच्या जमिनी वार्षिक खंडानें कसणारा उपऱ्या शेतकरी असे. त्याला त्या जमिनीवर आनुवंशिक हक्क नसे किंवा ती कोणालाहि कसायला देण्याचा हक्क नसे. हे उप्री मिरासदारांच्या मानानें समाजांत खालच्या दर्जाचे मानले जात. मिरासदारांच्या पुढें त्यांना नमतें घ्यावें लागे. यावरून निर्विवादपणें असें सिद्ध होतें कीं, ग्रामसंस्थेची पूर्वकालापासून चालत आलेली जमिनीवरील मालकी किंवा प्रभुत्व मराठ्यांच्या अमदानींत शिथिल झालें होतें. मराठेशाहींतील मिरासदाराचा जमिनीवर खासगी हक्क इतका मान्य झाला होता कीं, त्याला आपली जमीन दुसऱ्याला आपल्या इच्छेप्रमाणें देतां किंवा विकतां येत असे. ;जमिनीवर ग्रामपंचायतीचा सामवायिक हक्क संपुष्टांत आला होता याचा हाच स्पष्ट पुरावा होय. हिंदू संस्थांच्या इतिहासांत जमीनमालकीबाबत इतका निःसंदिग्ध पुरावा दुसऱ्या कोणत्याहि काळचा मिळत नाहीं.

वर जें विवेचन केलें आहे त्यावरून आढळून येईल कीं, एकंदरींत प्राचीन काळीं जमिनीच्या मालकीसंबंधीं नक्की स्थिति काय होती यासंबंधीं निःसंदिग्ध विधान करणें अशक्यप्रायच आहे. प्राचीन काळच्या कांहीं संदिग्ध, अर्धवट माहितीवरून दोन भिन्न विचारसरणींच्या विचारवंतांनीं दोन भिन्न निष्कर्ष काढले आहेत, याचें दिग्दर्शन वर आलेंच आहे. "ग्रामपंचायती या संस्था पूर्वीपासून कार्यक्षम होत्या; हिंदुराज्यें नामशेष झालीं तरी ग्रामसंस्था नष्ट झाली नाहीं; उलट, ब्रिटिश लोकांची कारकीर्द सुरू होईपर्यंत आमच्या ग्रामसंस्था जिवंत होत्या" असें भारतीय लेखकांचें ठाम मत आहे. याउलट, "ब्रिटिश राज्य येथें सुरू होण्यापूर्वींच ग्रामसंस्था मरणाच्या पंथाला लागली होती. अर्थात्, याचा अर्थच हा कीं, जमिनीची मालकी राजाकडे गेली होती" असें पाश्चात्त्य विचारवंतांचें मत आहे.

स्वावलंबन व सहकार्य यांचें आशादायक दर्शन : प्रा. रा. सी. देशपांडे

# खानदेशांतील एक आदर्श खेडें : उंबरखेडें

भारताच्या आर्थिक विकासाच्या योजनेंत ग्रामीण जीवनाची सुधारणा करणें आणि जनतेच्या राहणीचें मान वाढविणें ह्या बाबी सर्वांत महत्त्वाच्या आहेत, हें आतां सर्वमान्य झालें आहे. लाखों खेड्यांचा उद्धार झाल्याशिवाय भारताला नवीन स्वरूप येणें अशक्य आहे. तेथील लोकांचें अज्ञान घालविल्याशिवाय भारतांतील बहुसंख्य जनता साक्षर झाली असें म्हणतां येणार नाहीं. तेथील लोकांचें जीवनमान सुधारलें नाहीं तर भारताचा आर्थिक विकास झाला असें म्हणतां येणार नाहीं, हें आतां सर्वांना पटलें आहे. परंतु इतर सर्व आर्थिक प्रश्नांप्रमाणें ग्रामविकासाचा प्रश्न समजण्यास जितका सोपा वाटतो तितकाच तो सोडविण्यास कठीण आहे. भारतांतील खेड्यांची वेडीवांकडी रचना, लोकांचें अज्ञान आणि अस्वच्छता, जुन्या पद्धतीच्या उपकरणांचा उपयोग, रूढिप्रियता व अंधश्रद्धा आणि शहरांतून येणाऱ्या अधिकारी लोकांची वागणूक —ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे त्यांचा उद्धार होण्यास शतकानुशतकें लागतील कीं काय असें वाटूं लागतें. खरोखरींच अजिंठा-वेरूळ येथील कोरीव लेण्यांप्रमाणेंच भारतांतील स्वच्छ व प्रगतिमान् खेडींहि एका हाताच्या बोटांनीं मोजण्याइतकींच असतील. आणि म्हणूनच एखादें खेडें ' आदर्श ' म्हणून मान्यता पावलेलें असलें तर त्याबद्दल जास्तच कुतूहल वाटतें. त्याच्या आदर्शत्वाबद्दल मन साशंक होतें. माझ्या पी. एच् डी. च्या संशोधनाच्या कामाकरितां उंबरखेडें ह्या आदर्श गांवीं जाण्याकरितां मी चाळीसगांव स्टेशनवर उतरलों त्या वेळीं या साशंकतेचेंच काहूर माझ्या मनांत माजलें होतें. उम्बरखेडला मुंबई सरकारनें ' आदर्श गांव ' म्हणून १९४९ सालीं ढाल दिली आहे हें मला माहीत होतें आणि त्याचा घेतलेला चित्रपटहि मीं पाहिला होता. सरकारनें ठरविल्याप्रमाणें व चित्रपटांत दिसतें त्याप्रमाणें तें खरोखरींच आहे काय याबद्दल मला कुतूहल होतें. त्याकरितां मी उम्बरखेडला जाऊन आलों ( १।१।५३ ). तेथें जी प्रत्यक्ष वस्तुस्थिति मला दिसली तिचें संक्षिप्त वर्णन पुढें दिलें आहे.

चाळीसगांवच्या उत्तरेस बारा मैलांवर उंबरखेड वसलेलें आहे. या गांवीं जाण्याकरितां मोटारींत मी जों बसलों तों बसल्यावरच पाहिलेंच वैशिष्ट्य मला असें आढळून आलें कीं, ही मोटरसर्व्हिस उंबरखेडच्या ' शिवाजी विविधकार्यकारी सहकारी संस्थे 'नें चालविलेली होती. सहकारी पद्धतीनें खेड्यांतील लोकांनीं चालविलेली ती पहिलीच बस सर्व्हिस होय. सुमारें अर्ध्या तासाच्या प्रवासानंतर उम्बरखेडला पोहोंचलों.

आजच्या खेड्यांची वास्तुशास्त्रानुसार आधुनिक पद्धतीनें पुनर्रचना करावयाचें ठरविलें तर पुष्कळशा खेड्यांचें वसतिस्थानच बदलण्यापासून सुरवात करावी लागेल. कारण बरीचशीं खेडीं नदीच्या उंचसखल किनाऱ्यावर अगर टेकडीच्या उतरणीवर वसलेलीं आहेत. तसेंच, कित्येक खेड्यांची घरबांधणी आणि रस्ते यांची रचना इतकी अव्यवस्थित आहे कीं, काटकोनी व एकमेकांस समांतर असे रस्ते तयार करण्यासाठीं कित्येक इमारती जमीनदोस्त कराव्या लागतील. उम्बरखेडचें मात्र तसें नाहीं. चाळीसगांव-मालेगांव रस्त्यापासून सुमारें एक मैलावरील एका सपाट जागेवर तें वसलेलें आहे. शके १८०३ पर्यंत तें गिरणेच्या कांठीं वसलेलें होतें. त्या वर्षी महापुरामुळें गांव वाहून गेल्यामुळें नवीन गांव गिरणेपासून कांहीं अंतरावर वसविण्यांत आलें. नवीन गांव इतक्या पूर्वीचें असूनहि अगदीं नमुनेदार पद्धतीनें वसविलें आहे. रस्ते एकमेकांना काटकोन करणारे आणि समांतर असे असून, त्यांच्या दोन्ही बाजूंस शेतकरी पद्धतीचीं नीटनेटकीं घरें वसविलीं आहेत. गांवाच्या मध्यभागीं मोकळें आणि स्वच्छ पटांगण असून त्याचा उपयोग दररोज भाजीपाला विकण्यासाठीं आणि सार्वजनिक सभेसाठीं होतो. गांवाची शेवटची गल्ली विशेषतः गुरेंढोरें बांधण्यासाठीं वापरावयाची आहे. ही पद्धतशीर रचना आणि योजनाबद्ध आंखणी त्या वेळच्या श्री. तुकाराम

मिस्त्री नांवाच्या सुतार कारागिरानें केली असें सांगतात. म्हणजे उम्बरखेडें हें कालच्या राष्ट्रवादाच्या मोहिमेंतलें अपत्य नसून त्यास जुनी परंपरा आहे. त्याच्या आदर्शत्वाचीं पाळेंमुळें खोल रुजलेलीं आहेत आणि म्हणून ती परंपरा जास्तींत जास्त टिकण्याची शक्यता आहे.

सर्वसामान्य खेड्यांचा दुसरा विशेष असा असतो कीं, त्यांत मरीआईपासून महादेवापर्यंत अनेक देवांचीं मंदिरें आणि जुने वाडे असतात. त्यांतील बहुतेक जीर्णावस्थेंतच असून त्यांची दुरुस्ती व रंगरंगोटी वर्षानुवर्षे झालेली नसते आणि जणूं कांहीं खेड्याचें सर्व दैन्य त्यांत प्रतिबिंबित झालेलें असतें! उम्बरखेडची स्थिति तशी नाहीं. गांवांत पदार्पण करतांच विविध रंगांनीं सुशोभित केलेला महादेवाच्या मंदिराचा कळस आपल्या दृष्टीस पडतो. तेवढेंच तेथलें मंदिर! सर्वसामान्य खेड्यांचा आणखी जो विशेष म्हणजे–मोटरस्टँडच्या भोंवतीं चहा व भजीं विकणारीं गलिच्छ हॉटेल्स आणि गांवांतील निरुद्योगी आणि टवाळ लोकांचा तेथें जमलेला घोळका–तोहि उम्बरखेड्यांत आढळत नाहीं. 'आळशीपणा आणि फाजील खर्चाला उत्तेजन देणारीं हॉटेलें आम्हीं बंद केलीं आहेत' असें मला गांवच्या लोकांनीं सांगितलें. गांवाचें एकूण स्वरूप अतिशय मनोहर असून, अधिक विकसनाला आवश्यक असलेली मजबूत पाया-बांधणी तेथें असल्याचें मला आढळून आलें.

उम्बरखेडच्या सुधारणेचें सर्व श्रेय तेथील ग्रामपंचायत आणि 'शिवाजी विविधकार्यकारी सहकारी संस्था' यांनाच देणें योग्य होईल. या दोन संस्थांनीं खेड्यांतील पुष्कळ उपयुक्त कामें हातीं घेऊन तीं यशस्वी रीतीनें पार पाडलीं आहेत. याचीं कारणें कोणतीं? काय, गांवांतील लोक एकाच जातीचे आहेत कीं ज्यामुळें त्यांची लवकर एकजूट होऊं शकली? काय, गांवांतील लोक अतिशय सधन आहेत कीं ज्यामुळें त्यांना मोठमोठ्या योजना हातीं घेणें सुकर झालें?–तसें मुळींच नाहीं! तीन हजार वस्तीच्या गांवांत मराठे-पाटील-समाजाव्यतिरिक्त इतर जातींचेहि लोक आहेत. गांवची जमीन सर्वसामान्य असून लोकांची आर्थिक परिस्थितीहि सामान्यच आहे. असें असूनहि एक-दोन इसमांच्या नेतृत्वाखालीं ग्रामपंचायत आणि विविधकार्यकारी संस्था यांनीं ग्रामविकासाचीं कार्यें अल्पावधींत पार पाडलीं आहेत.

येथील ग्रामपंचायत १९४२ सालीं सुरू झाली. पंचायतीच्या उत्पन्नाच्या बाबींकडे पाहणें मोठें उद्‌बोधक ठरेल. गेल्या पांच-सहा वर्षांचें तिचें सरासरी वार्षिक उत्पन्न पांच तें सहा हजारांचें असून, त्यांपैकीं घरें आणि जमिनींवरील करापासूनचें उत्पन्न सुमारें रु. ४२५ आणि लोकल-सेसचें उत्पन्न रु. २५५ चें आहे. सर्वांत मोठ्या रकमा गांवांतील लोकांकडून आलेल्या देणग्या आणि सरकारी बक्षिसाच्या आहेत. गेल्या ५ वर्षांत गांवांतील लोकांनीं दर वर्षी सरासरी रु. १३१९ ची देणगी दिली आहे. तसेंच दर वर्षी कोणत्या ना कोणत्या चढाओढींत भाग घेऊन गांवच्या लोकांनीं बक्षिसें मिळविलीं व बक्षिसाच्या सर्व रकमा ग्रामपंचायतींत जमा केल्या. त्या रकमेची वार्षिक सरासरी रु. ५०० तरी आहे. म्हणजे ग्रामपंचायतीच्या दर वर्षीच्या एकूण उत्पन्नाचा तिसरा हिस्सा देणग्या व बक्षिसें ह्यांतून आलेला आहे. गांवलोकांनीं मिळविलेली बक्षिसांची यादीहि येथें द्यावीशी वाटते: १९४७-४८ सालीं उत्तम ग्रामसुधारणेबद्दल गांवास रु. १००० रोख बक्षिस मिळालें. १५ ऑगस्ट १९४८ रोजीं गांवाजवळ असलेल्या पडीत शेतांत वृक्षारोपण करून तीं वर्षभर जगवून दाखविलीं याबद्दल मध्यविभागांत हें गांव पहिलें आलें, म्हणून त्यास रु. ५०० रोख बक्षिस मिळालें. तसेंच, 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेंत भाग घेऊन एकरीं जास्तींत जास्त धान्य पिकविल्याबद्दल रु. १००० चें बक्षिस मिळालें. ह्याशिवाय कमी रकमेचीं बक्षिसें आणि ढाली निराळ्याच. आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें पाहतां पंचायतीस १९५०–५१ साल भरभराटीचें गेलें असें म्हणतां येईल. त्या सालीं तिचें एकूण उत्पन्न सुमारें रु. १५ हजारांचें असून, त्यांपैकीं ५ हजार सरकारी कर्ज, रु. १००० मक्त्याच्या कामावरील नफ्याचें, ६२५ रु. देणग्या आणि रु. १५००







सरकारकडून मिळालेल्या बक्षिसाचें होतें. ग्रामपंचायतीचें उत्पन्न स्वावलंबनामुळेंच इतकें वाढलें हें उघड आहे. ह्या स्वावलंबनाचें प्रत्यंतर ग्रामपंचायतीच्या खर्चाची बाजू पाहिल्यास विशेषत्वानें दिसून येतें. वृक्षारोपणाच्या कामाबद्दल मिळालेल्या रोख बक्षिसाचा उपयोग पंचायतीनें पलें आणण्याकडे केला आणि स्त्रियांकरितां चार आडोशाचें व तीन ठिकाणीं चर संडास तयार करून ५४ सीट्सची व्यवस्था केली. संडासांकरितां सरकारकडून पंचायतीस ३ हजार रुपयांचें कर्ज व २ हजार रुपयांची 'सब्सिडी' मिळाली. तसेंच पंचायतीनें २५०० फूट लांबीचीं गटारें तयार केलीं असून, इतर ठिकाणीं कच्चीं गटारें खोदलीं आहेत. गांवांत पिण्याच्या पाण्याच्या विहिरी, दिवेबत्ती, साफसफाई, शाळा, धर्मशाळा, दवाखाना इत्यादि व्यवस्था आहेच. ग्रामपंचायतीनें गांवसफाई करणाऱ्या भंगी कुटुंबास स्वखर्चानें घर बांधून दिलें असून तें गांवाच्या मध्यभागीं आहे. गेल्या दोन वर्षांत पाऊस कमी पडल्यामुळें गांवांतील विहिरी कोरडया पडल्या आहेत. म्हणून गांवच्या लोकांनीं असा नियम केला आहे कीं, ज्या लोकांजवळ बैलगाडया आहेत त्यांनीं गिरणेवरून पाणी आणावयाचें आणि ज्या गरीब लोकांजवळ बैलगाडया नाहींत त्यांनींच गांवांतल्या विहिरींचें पाणी वापरायचें. आतां ग्रामपंचायतीनें नळानें पाणीपुरवठा करण्यासाठीं सुमारें १ लाख रुपयांची योजना आंखली असून, त्यापैकीं निम्में भांडवल ग्रामपंचायत उभारणार आहे. या योजनेचा विशेष असा कीं, त्यास लागणारें एंजिन व पंप तेथील पाटबंधारा-सहकारी-संस्थेजवळ आहेतच, त्याचाच उपयोग ग्रामपंचायत गांवचा पाणीपुरवठा करण्याकडे योजीत आहे. शिवाय, योजनेसाठीं लागणारी दगड, विटा, मजूर इत्यादि सामग्री पंचायत गांवांतूनच किफायतशीर भावानें उपलब्ध करणार आहे.

उंबरखेडच्या विकासास कारणीभूत झालेली दुसरी संस्था—'शिवाजी विविधकार्यकारी सहकारी संस्था' ही होय. ही संस्था १९४५ सालीं रजिस्टर होऊन अवघ्या सात वर्षांच्या कालावधींत तिनें भरीव कार्य केलें आहे. तिच्या कार्यक्षेत्राची त्रिज्या ५ मैलांची असून त्यांत सोळा खेडीं येतात. त्यांपैकीं आठ खेड्यांचे लोक संस्थेचे सभासद झाले असून, हल्लीं तिची सभासदसंख्या १६५ आहे. त्यांपैकीं उंबरखेडच्या बाहेरचे ७९ सभासद आहेत. इतर सहकारी संस्थांप्रमाणें ही संस्थाहि बी-बियाणें व खत पुरविणें, लोखंडी नांगर व ट्रॅक्टर भाड्यानें देणें, धान्यदुकान, कापडदुकान व किराणा दुकान चालविणें इत्यादि कामें करीत आहे. त्याशिवाय सोसायटीचे जे विशेष आहेत त्यांचा उल्लेख येथें करणें इष्ट आहे. तिनें चालविलेल्या चाळीसगांव ते उम्बरखेड बस-सर्व्हिसचा उल्लेख सुरुवातीस केलाच आहे. सोसायटीस सुरुवातीस बस-सर्व्हिस सुरू करतांना अशा धंद्यास बँकेकडून कर्ज मिळेना. तेव्हां गांवांतील चांगली परिस्थिति असलेल्या वाणी समाजांतील लोकांनीं व तेथील ग्रामपंचायतीचे सरपंच श्री. रामराव पाटील त्यांनीं बिन व्याजानें सोसायटीस रकमा दिल्या व बस-सर्व्हिस सुरू करण्यास मदत केली. त्या सर्व रकमा तीन वर्षें वापरून सोसायटीनें परत केल्या. सोसायटीस १९५१–५२ सालीं जो रु. ७२९४ चा नफा झाला त्यांत रु. ३३०० चा हिस्सा मोटार-विभागानें दिला आहे. आज सोसायटीजवळ रु. ४८३७ इतका मोटार-फंड सांचला आहे. सोसायटीचें दुसरें उल्लेखनीय कार्य म्हणजे तिनें 'बॉम्बे कोऑपरेटिव्ह इन्शुअरन्स सोसायटी'ची विमाएजन्सी घेतली असून त्या व्यवहारापासून ती कमिशन मिळविते. भारतांतील खेड्यांत विमा-योजनांचा प्रसार जवळजवळ नाहींच. या दृष्टीनें या विविधकार्यकारी संस्थेनें हें कार्य हातीं घेऊन औचित्य साधलें आहे. विमाएजन्सीच्या कामांत भांडवलाची गरज नसते आणि कमिशन मात्र पदरीं पडतें. त्या दृष्टीनें सहकारी संस्थेनें हें कार्य हातीं घेऊन मिळालेल्या कमिशनचा विनियोग सार्वजनिक कार्याकडे केला हें इष्टच आहे. सोसायटीचें तिसरें महत्त्वाचें कार्य पशुसंवर्धनासंबंधींचें होय. खिलारी गाईंची जोपासना, सांड पुरविणें आणि चांगल्या तऱ्हेची लोंकर देणाऱ्या मेंढ्यांची पैदास करणें हीं तिचीं कार्यें चालू आहेत. गुरांना







औषधी पाण्यानें स्नान घालणारे 'कॅटल-डिप' बांधले आहेत. हल्लीं सोसायटीजवळ 'कॅटल-डिप फंड' रु. १५८३ इतका सांठला आहे. जनावरांना ओला चारा मिळावा म्हणून ग्राम-सुधारणा-मंडळानें दिलेल्या दोन हजार रुपयांच्या देणगींतून सोसायटीनें 'सायलो-पिट' बांधला आहे. १९५१–५२ सालीं सभासदांनीं सायलो-पीटमध्यें ४० हजार पौंड गवत भरलें होतें. सोसायटीजवळ सध्यां 'सायलो-पीट फंड' रु. २०४६ चा सांठलेला आहे. आज वि. का. स. सोसायटीचें शेअरभांडवल सुमारें ११ हजार रुपयांचें असून एकूण भांडवल रु. ३४३४४ चें आहे.

'विविधकार्यकारी सहकारी सोसायटी' बरोबरच 'पाटबंधारा-सहकारी-सोसायटी' आणि 'सामुदायिक शेती सोसायटी' यांचेंहि कार्य उल्लेखनीय असेंच आहे. पाटबंधारा सोसायटी १९४७ सालीं स्थापन झाली असून सध्यां तिचे २९ सभासद आहेत. गिरणा नदीच्या कांठीं एंजिन व पंप बसवून सुमारें पाऊणशें एकर जमिनीस पाणी पुरविण्याचें काम सोसायटीनें पूर्ण केलें आहे. या एंजिनचा उपयोग गुऱ्हाळाचें काम करण्याकडेहि होतो. एंजिन व पाईप-लाईन वाढवून दोनशें एकरांपर्यंत बागाईत करण्याची सोसायटीची योजना आहे. ह्या योजनेचा उंबरखेडला पाणीपुरवठा करण्याचाहि हेतु आहेच. अशा रीतीनें बागायती शेती, गुऱ्हाळ आणि पाणीपुरवठा अशा त्रिविध कार्याचा पसारा 'पाटबंधारा-सोसायटी'कडून होणार आहे. सामुदायिक शेतकी सोसायटीनें जवळच्या उपखेडें जंगलांतील ४९६ एकर जमीन कसण्यास सुरुवात केली आहे. सुरुवातीस सोसायटींत उम्बरखेडचेच सभासद होते. नंतर उपखेडचे गरीब सभासद मिळवून त्यांच्या ताब्यांत ही संस्था सोंपविण्यांत आली असून, उम्बरखेडच्या लोकांनीं आपलें सभासदत्व काढून घेतलें आहे. ह्याशिवाय इतर सहकारी आणि शैक्षणिक संस्थाहि उंबरखेड्यांत आहेतच. एकंदरींत सहकारी संस्थांचें महत्त्व येथील लोकांना पटलेलें आहे असें दिसलें. त्यांच्या कपाशीच्या व्यवहारासंबंधीं माहिती घेत असतांना मला आढळून आलें कीं, बहुसंख्य शेतकऱ्यांनीं चाळीसगांव मार्केटांत इतर व्यापाऱ्यांच्या अडतींत आपला माल न विकतां 'चाळीसगांव खरेदी-विक्रीसंघा'मार्फत तो विकला. गांवांत प्राथमिक शाळा इ० ७ पर्यंत आहे. शाळेंत ५०० मुलें असून १२ शिक्षक आहेत. सूत-मूलशिक्षणोद्योगद्वारें शिक्षण देतात.

उम्बरखेडें हें एक शेतकीप्रधान गांव आहे आणि शेतीच्या धंद्यास लागणाऱ्या सर्व सहकारी संस्था उम्बरखेड्यास स्थापन झालेल्या आहेत आणि प्रगति पावल्या आहेत. खेड्यांतील लोकांची प्रगति घडवून आणण्यास शहरांतील पुढारी अथवा सेवापथकांपेक्षां खेड्यांतच राहून हुशारीनें आणि निःस्पृहपणें काम करणाऱ्या ग्रामीण पुढाऱ्याची आवश्यकता आहे. असा पुढारी उम्बरखेड्यास मिळाला आहे असें दिसतें. उम्बरखेडच्या सर्व संस्था श्री. रामराव पाटील यांच्या मार्गदर्शनाखालीं कार्य करीत आहेत. त्याच्या सर्व प्रगतीचें श्रेय त्यांनाच देण्यांत येतें. त्यांच्या सहकारी बंधूंतहि ग्रामसेवेची वृत्ति मला आढळून आली. यंदां तेथील वाणी समाजांतील एका शेतकऱ्यानें अधिक धान्य पिकविण्याच्या चढाओढींत भाग घेऊन एकरीं ८२॥ मण ज्वारी पिकविण्याचा विक्रम केला. त्याच्याशीं चर्चा करतांना तो मला म्हणाला, "लोक पैशाच्या लोभानें धान्येतर पिकें उगीचच पेरतात. केळीचें उत्पन्न घ्यावयाचें ठरलें तर त्याखालीं दोन वर्षें जमीन पडून राहते. तेवढ्या अवधींत चार अन्नधान्यांचीं पिकें घेतां येतात आणि पैसाहि केळ्यांच्या उत्पन्नाइतकाच मिळतो." त्याच्या ज्वारीच्या विक्रमाबद्दल बोलतांना त्यानें सांगितलें कीं, "कदाचित् मला चढाओढींत बक्षिस मिळालें तर पांच हजारांतली निम्मी रक्कम गांवांतील सर्वोदय-विद्यालयास मी देऊन टाकणार आहे." त्या वाणी शेतकऱ्याचा हा संकल्प उम्बरखेडच्या सांस्कृतिक प्रगतीचाच द्योतक नव्हे काय?–उम्बरखेडपासून इतर खेड्यांनीं पुष्कळच शिकण्यासारखें आहे. स्वावलंबन व सहकार्याच्या साहाय्यानें केलेलें कार्यच अधिक भक्कम व चिरस्थायी होतें, याचें आशादायक दर्शन उंबरखेड करून देतें.

श्रेष्ठ कन्नड साहित्यिकाचें व्यक्तिदर्शन : श्री. गौरीश कैकिणी

# श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार

कै. न. चिं. केळकरांना आम्ही 'साहित्य-सम्राट्' मानतों तसेंच आपली भाषाभगिनी जी कन्नड भाषा तिच्या प्रपंचांत कुणी साहित्य-सम्राट् आहेत का, असें मराठीचे मानकरी ऐटीनें विचारतील ! त्यावर कन्नडाचे कैवारी तशाच दिमाखानें उत्तर देतील : "होय, आमचेहि सम्राट् आहेत. कन्नड राज्यश्रीचें माहेर म्हैसूर. तिथें दोन राजे नांदत आहेत. एक कन्नड मुलुखाचे राजे— 'कन्नड रमारमण कर्नाटकरत्नपीठाधीश्वर' श्री. जयधामराजेंद्र ओडेयर अन् दुसरे—साहित्य-'श्रीनिवास' कन्नड रसपीठाचे सम्राट् श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार !" निराकरणाची किंवा अतिशयोक्तीची भीति न बाळगतां मी हें विधान करूं शकतों कीं, मास्ती हे कन्नडांत 'साहित्यसम्राट्' आहेत.

## कन्नड साहित्यांतील दिक्पाल

कन्नडांत अष्टपैलू लेखक वा सर्वतोमुख प्रतिभावंत दुसरे नाहींत असें नाहीं. आपले अंबिकातनय दत्त बेंद्रे आहेत. त्यांच्या त्या समुज्ज्वल प्रतिभेचें चतुरस्र सौंदर्य कोणत्याहि परभाषीय 'शब्दब्रह्मा'ला शोभेलसें आहे. 'साहित्यसव्यसाची', 'कन्नड कवितिलक' अशा बिरुदावली त्यांना जाणत्यांनीं दिल्या आहेत.—तसेंच श्री. के. वि. पुट्टप्पा आहेत. त्यांनीं पुष्कळ दृश्य काव्यें, सरस गोष्टी, एक प्रचंड कादंबरी, कांहीं विमर्शात्मक लेखसंग्रह व ज्यांच्या अनेक आवृत्ती निघाल्या आहेत असे रम्य-गंभीर कवितासंग्रह लिहिले आहेत. हल्लीं तर त्यांनीं 'रामायण-दर्शन' नांवाचें मोठें महा-काव्य लिहिलें आहे. आदिकवि वाल्मीकी-नंतर रामायणाचे कवि "झाले बहु होतिल बहु", पण बेंगळूरच्या रामकृष्ण मठांत तपस्वी नैष्ठिक जीवन कंठणारा हा आधुनिक महाकवि—"त्या-सम तो" अशी त्यांच्या भक्तांची व असंख्य रसिकांची ग्वाही आहे.—नंतर श्री. डी. व्ही. गुंडप्पा आहेत. ते राजकारणी, साहित्यशास्त्रज्ञ,

---

गेल्या नोव्हेंबर १९५२ च्या ३० तारखेस, 'आंतर-भारती' तर्फे श्रेष्ठ कन्नड साहित्यिक श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांचा पुणें येथें सत्कार झाला. या सत्काराच्या निमित्तानें आपल्या निकटवर्ती भाषाभगिनीच्या संसारांतील एका श्रेष्ठ साहित्यिकाचा परिचय वाचकांना पूर्वी झालाच आहे. प्रस्तुत स्थळीं त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा अधिक परिचय करून देण्यांत आलेला आहे. हा परिचय करून देणारे श्री. गौरीश कैकिणी हे श्री. मास्तींचा निकट सहवास अनुभविलेले, त्यांच्या वाङ्मयाचा मुळांतून आस्वाद घेतलेले एक रसिक असून, स्वत: कन्नड साहित्यांतील एक प्रभावी लेखकहि आहेत. त्यामुळें त्यांच्या श्री. मास्तींच्या या शब्दचित्राला विशेषच महत्त्व आहे.—याच अंकांत श्री. मास्ती वेंकटेश यांची 'गौतमीची गोष्ट' ही कथा मूळ कन्नडवरून अनुवादित करून दिली आहे. एका श्रेष्ठ साहित्यिकाचें व्यक्तिदर्शन व त्याचबरोबर त्यांच्या एका नांवाजलेल्या कलाकृतीचा आस्वाद हा योग वाचकांस औचित्यपूर्ण वाटेल. —का. सं.

रससमीक्षक, गंभीर शैलीकार, मर्मज्ञ कवि, गोखल्यांचे शिष्य, प्रभावशाली वक्ते व ओजस्वी लेखक आहेत. त्यांचें नांव घेतांना गटे व मेकॉले या दोघांचीहि आठवण होते.—त्याचप्रमाणें दक्षिण कन्नड जिल्ह्याचे मंगळूररहिवासी श्री. शिवराम कारंत आहेत. (यांचे ज्येष्ठ बंधु मागें मद्रास सरकारचे एक मंत्री होते.) हे कारंत एक अजब प्रस्थ होय. त्यांनीं काय लिहिलें आहे असें म्हणण्यापेक्षां काय लिहिलें नाहीं, असाच प्रश्न टाकावा ! त्यांच्या कादंबऱ्या विपुल व तशाच लोकप्रिय आहेत. टॉमस हार्डी च्या 'वेसेक्स' कादंबऱ्यांप्रमाणें यांच्या कादंबऱ्या प्रादेशिक जीवनाचीं सजीव, सोज्ज्वल प्रतिबिंबें आहेत. खांडेकरांची हृदयविशालता, माडखोलकरांची वैचारिकता, वरेरकरांची मर्मभेदक समाजसुधारक दृष्टि, रांगणेकरांचा व्यंग्य-विनोदी विदारक उपरोध या सर्वांचा समन्वय त्यांच्या कादंबऱ्यांत प्रकर्षानें प्रकट झाला आहे. (अर्थात् या मराठी लेखकांचा संपर्कहि त्यांना नाहीं !). ते कथालेखकहि आहेत, यशस्वी नाटककारहि आहेत. नाट्यक्षेत्रांत छायानाटकें व गीतनाटकें (ऑपेरा) त्यांनीं पहिल्यांदा रचून रंगभूमीवर यशस्वी करून दाखविलीं. जीवनविमर्शात्मक, विधायक, विडंबक, विनोदी व विचारप्रवर्तक लिखाण त्यांनीं पुष्कळ केलें आहे. शिशुकथा, पाठ्यपुस्तकें, शब्दकोश व कन्नडांतील एकमेवाद्वितीय ज्ञानकोश हीं त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. हा कोश बालकांसाठीं म्हणून लिहिला 'बालप्रपंच' या नांवानें; पण पालकबुवांनींहि वाचून शहाणें व्हावें अशा योग्यतेचा तो वठला आहे ! चलचित्रप्रपंचहि त्यांनीं हाताळला आहे. किंडरगार्टन शाळेचाहि प्रयोग त्यांनीं करून पाहिला आहे. स्टिन्सेल्स् व स्लेटींचा कारखानाहि त्यांनीं काढला. 'यक्षगान' या कन्नड जानपद नाट्यप्रकारांत विशेष परिश्रम करून, आपलें कलामंडळ स्थापून, दौरे काढून, त्या कलेची मशाल ते मुंबईपर्यंत मिरवून आले आहेत. आपल्या गीत-रूपकांची संगीतरचना ते स्वतःच करतात. आपल्या पुस्तकांसाठीं चित्रें, छायाचित्रें, आकृती स्वतःच काढतात. श्री. गोकाक व श्री. श्रीरंग हे उच्च शिक्षणासाठीं जाऊन आलेले वगळले तर युरोपचा प्रवास करून आलेले ते एकटेच कन्नड साहित्यिक आहेत.—असे हे बहुप्रसव प्रतिभेचे शूर, सव्यसाची साहित्यिक आहेत. आणखी एक कन्नड पुरोगामी साहित्याचे पुरोहित श्री. अ. न. कृष्णराय आहेत. हे प्रणयमधुर कादंबरी लिहिणारे लोकप्रिय साहित्यिक आपल्या क्षेत्रांत अद्वितीय आहेत. त्यांच्यासारखा शीघ्र कथा-लेखक आणि लालित्यपूर्ण संवाद रचणारा दुसरा कादंबरीकार कन्नडांत नाहीं. त्यांचा लेखनविलास व लोकप्रियतेची शीग प्रा. ना. सी. फडके यांच्या तोडीची म्हणतां येईल. त्यांनीं लघुकथा पुष्कळ लिहिल्या आहेत. यशस्वी नाटकें व पटकथाहि रचल्या आहेत.—आणि नंतर श्रीरंग. यांचें मूळचें नांव आर. व्ही. जागीरदार. हे लंडनचे पदवीधर. आतांचें नवें नामकरण 'आद्यरंगाचार्य' असें आहे. हे संस्कृतचे प्राध्यापक आहेत. संस्कृत नाटकांविषयीं त्यांचा प्रबन्ध डॉ. कीथच्या तत्सम ग्रंथानंतर त्या क्षेत्रांत मोठा मौलिक भर घालणारा म्हटला जातो. तसेंच, ज्ञानेश्वरीच्या भाषेवरील त्यांचा प्रबन्ध तौलनिक भाषाशास्त्रावरील त्यांचा अधिकार तेवढ्याच प्रशस्तीनें दाखवितो. हे दोन ग्रंथ इंग्रजींत लिहिणाऱ्या या स्वतंत्र प्रज्ञेच्या विद्वानानें 'गीतागांभीर्य' नांवाचा अप्रतिम ग्रंथ कानडींत लिहिला आहे. आपला हा ग्रंथ गीतेवरील लोकमान्यांच्या 'गीतारहस्या' नंतर त्याहून वरचढ होणार, अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं तें पुस्तक लिहितेवेळीं काढले होते. तसेंच, त्यांनीं 'हास्य' या विषयावर स्वतंत्र विचारांनीं नटलेलें छोटें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. याखेरीज कन्नड साहित्यांत त्यांना मिळालेलें अढळ पद त्यांच्या नाट्यनिर्मितीमुळें होय. ते कन्नडाचे बर्नार्ड शॉ गणले जातात. त्यांच्या विपुल एकांकी व अनेकांकी नाटकांनीं कन्नडाची नवी रंगभूमि सजली आहे. त्यांनीं तीन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. प्रत्येक कादंबरी तंत्रदृष्टीनें अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहे. जिला 'संज्ञाप्रवाह-पद्धति' ('stream of consciousness') म्हणतात त्या शैलीचा अवलंब श्रीरंगांनींच कन्नडांत प्रथम केला. त्यांचा एक कवितासंग्रहहि प्रकट

झाला आहे.—श्री. बेटगेरी कृष्णशर्मा हे यशस्वी संपादक, त्याहूनहि यशस्वी कथालेखक व लोकप्रिय कादंबरीकार आहेत. त्यांच्या कविताहि लोकांच्या आवडीच्या झाल्या आहेत. हल्लीं ते 'रेडिओरूपकें' लिहिण्यांतहि सिद्धहस्त ठरले आहेत.—त्याचप्रमाणें 'महाराष्ट्राला'—विशेषेंकरून मराठीची जी धारानगरी त्या पुण्याला—चांगलेच परिचित असलेले प्राचार्य **विनायकराव गोकाक** हे कानडींतील चतुरस्र लेखक व पंडितकवि आहेत. काव्य, कथा, नाटक व विमर्श या चतुरंग आघाडीवर त्यांच्या प्रतिभेनें मजल मारली आहे. तीन कवनसंग्रह, त्यांहून जास्त कादंबऱ्या (त्याहि एकाच अखंड कथानकावर पण स्वतंत्र प्रत्येक स्वयंपूर्ण वाचतां येण्याजोग्या) व लहानमोठीं दोन-तीन नाटकें हीं त्यांच्या कलोपासनेचीं गोड फळें आहेत. उत्तर कर्नाटकामध्यें आधुनिक साहित्यसमीक्षा त्यांनींच आरंभिली असें म्हणतां येईल. त्यांची प्रसन्न गद्यशैली विचारभरानें व भावपारवश्यानें सारखीच रसरसलेली असते. ते कन्नडाचे मॅथ्यू ॲर्नाल्ड शोभतात !—त्यांच्यानंतर आठवणारी दुसरी व्यक्ति म्हणजे प्राध्यापक **रं. श्री. मुगळी**. त्यांचीहि प्रतिभा चौफेर फांकली आहे. चांगल्यापैकीं चार कादंबऱ्या, तीन सुंदर कवितासंग्रह, कांहीं एकांकी व अनेकांकी प्रभावी नाटकें व दोन कथासंग्रह, यांखेरीज कर्नाटक संस्कृतीविषयीं इंग्रजींत लिहिलेला विद्वत्ताप्रचुर ग्रंथ व प्राचीन कन्नड कविचारित्रांविषयीं व्यासंगपरिप्लुत समालोचनात्मक लेखन—ही त्यांची साहित्यसेवा त्यांच्या बहुश्रुत व बहुमुखी सामर्थ्याची साक्ष पटविते.—यांच्याप्रमाणेंच म्हैसूरला **प्रा. वि. सीतारामय्या** आहेत. मला वाटतें त्यांच्या तोडीचा रससारज्ञ व विमर्शतज्ज्ञ कन्नडांत विरळाच. त्यांची हृद्य कविता फारच कोमल व कलात्मक असते. तिची चव द्राक्षां-डाळिंबांची आठवण देते. शिवाय त्यांच्या कीर्तींत भर टाकणारीं दोन उत्तम नाटकें प्रसिद्ध आहेत. ते मनोज्ञ मार्मिक वक्ते म्हणूनहि प्रसिद्ध आहेत. अर्थशास्त्रावरचा त्यांचा परिचायक ग्रंथ कन्नडांत अनन्यसामान्य आहे. त्यांनीं लिहिलेलें 'पंपायात्रा' हें प्रवासवर्णनात्मक पुस्तक त्या धर्तीच्या साहित्याला अजून नमुना होऊन राहिलें आहे.

### साहित्य आणि संसार यांचें सामंजस्य

असे अष्टपैलू प्रतिभेचे अष्ट दिक्पाल कन्नड साहित्यसाम्राज्याचे सीमापुरुष होऊन उभे ठाकले आहेत. पण त्यांपैकीं कुणालाहि साहित्य-सम्राट् म्हणतांना मन मागें सरतें. कारण त्या सम्राट्पदाला अवश्य ती व्यक्तिमत्तेची थोरवी, तें 'श्रीमद्विभूतिमत्त्व' केवळ **मास्ती व्यंकटेश अय्यंगार** या व्यक्तींतच आढळतें. त्यांच्या प्रत्यक्ष भेटींत कांहीं क्षण घालविले तरी तेवढ्या अवधींत त्यांच्या महत्तेची साक्ष पटते. आपल्या हृदयावर त्यांच्या अधिकाराची राजमुद्रा उमटते. मला स्वतःला त्याचा प्रत्यय पूर्णपणें आला आहे. त्यांना ऐकणें म्हणजे जिंकलें जाणें व त्यांच्यांशीं बोलणें म्हणजे त्यांचाच होणें. असा आहे 'मास्ती इफेक्ट्' !

त्यांचा हा व्यक्तित्वविशेष कशांत आहे ? अनेक प्रतियश, प्रभावशाली प्रतिभावंतांविषयीं असें आढळतें कीं, त्यांची व्यक्ति निराळी व त्यांची शक्ति निराळी ! एकापरीनें त्या व्यक्ती भिन्न व्यक्तित्वा-(split personality)च्या वाटतात. त्यांची बेजोड विद्वत्ता, बिनतोड वाग्मिता किंवा काव्यवैखरी व बहुश्रुतपणा हे सर्व अमोल गुण आम्हांला दिपवीत असतांनाहि आम्हांस वाटत असतेंच कीं, ही केवळ उत्सवमूर्ति आहे, मूलविग्रह निराळाच असावा ! साहित्य व चारित्र्य यांमध्यें संवादित्व किंवा सामंजस्य किती असावें, हा प्रश्न वाक् व अर्थ यांची संपृक्ति व प्रतिपत्ति जाणणारे जगाचे पितरच सोडवोत. पण एवढी गोष्ट खरी कीं, सामान्य साहित्यिकांमध्यें ज्ञान व शील यांचा समन्वय क्वचित्च साधलेला असतो. साहित्य ज्यांचा जीवनभरचा एक व्यवसाय किंवा हव्यास झाला आहे, अशा ख्यातनाम लेखकांच्या बाबतींतहि हीच गोष्ट आढळते. ते आपल्या व्यासपीठाची धूळ झाडून साहित्यप्रौढीचें शेलापागोटें खुंटीवर ठेवून मोकळे होतात तेव्हां त्यांचें जणुं दुसरें व्यक्तित्व ( personality ) प्रकट होतें. डॉ. जेकीलच मि. हायिड आहे हें सहसा



अनुक्रमणिका






पटत नाहीं. नव्हे, कधीं कधीं पटूं नयेसें वाटतें. हें कांहीं मी निंदाव्यंजनेनें लिहीत नाहीं. याला कारण अशा माणसांत व्यक्तित्वाचा समन्वय (integration) घडलेला नसतो. त्यांचें पांडित्य, कवित्व, वाक्पटुत्व वगैरे मुखवस्त्रांसारखे–'धर्मकंचुका'-सारखे–टिकाऊ असूनहि दिखाऊ असतात! फार तर ते आपला बहुश्रुतपणा सहज लीलेनें खेळवीत असतील, मोराच्या पिसाऱ्यासारखा हलकेंच मिरवीत असतील. पण ही त्यांची सहजता 'कला लपविणारी कला' असते. त्यांत चारित्र्यापेक्षां चातुर्याचा अंशच जास्त असतो. त्यांची साहित्यिक व्यक्तिमत्ता त्यांच्या स्वभावाची सहजावस्था बनलेली क्वचितच दिसून येते.

पण मास्तींचें तसें नाहीं. ते याला एक अमूल्य अपवाद आहेत. स्टुअर्ट राजा पहिला चार्लस याच्याविषयीं असें वर्णन केलें जाई कीं, "He was every inch a King." मास्तीहि तसेंच शोभतात. त्यांची शारीरिक उंची फार नाहीं. चेहऱ्याची दिव्यता किंवा देहाची भव्यता त्यांना लाभलेली नाहीं. त्यांच्या वाणींत विजेचा जोष नाहीं. त्यांची आकृति सामान्य, प्रकृति सौम्य. तरी पण त्या लहानशा उंचींत प्रत्येक इंच सौजन्य, संस्कृति व अभिजात सत्त्वशालिता यांनीं खचून भरला आहे. कन्नडांतील पहिल्या प्रतीच्या साहित्यिकांवर ही त्यांची अवीट छाप पडली आहे. त्यांचे टीकाकार किंवा निंदकहि त्यांच्यासमोर नम्र असतात. साहित्याच्या कोणत्याहि शाखेंत त्यांची सत्ता गाजते, त्यांचा शिक्का चालतो, ही एकच गोष्ट त्यांचें राजगांभीर्य सिद्ध करावयाला पुरेशी आहे. त्यांचें ज्ञान मोठा संभार बनून ते अभ्यासजड किंवा जडावाच्या अलंकारांनीं मढविल्यासारखे बनले नाहींत. तर तें सर्वच्या सर्व संस्कार बनून त्यांच्या व्यक्तित्वाला तेज, अनुभवाला परिपक्वता, शैलीला शोभा, वाणीला सत्त्व व प्रतिभेला पूर्णता आली आहे. कालिदासाची 'पूर्णता गौरवाय' ही उक्ति मास्तींविषयीं सार्थक होते. बुद्धि व भावना, तत्त्व व रस, ज्ञान व कला, भक्ति व व्यवहार, साहित्य व संसार, मोठेपणा व सरळता या द्वंद्वांचें सामरस्य त्यांनीं साधलें आहे. यांतच त्यांची अंतःशुद्धि व यशःसिद्धि सामावली आहेत.

## अभिजात संस्कृति

त्यांच्या बोलण्या-चालण्यांतून अभावितपणें ही अभिजात संस्कृति टपकते. एक साधेसें उदाहरण पाहा ना. एकदां ते आमच्याशीं बोलत बसले होते. बोलण्याच्या ओघांत आमच्या एका ग्रामपंचाननानें त्यांना कांहीं कौटुंबिक कुशल विचारतेवेळीं प्रश्न टाकला : "आपल्याला मुलें किती?" मास्तींनीं म्हटलें : "मला सर्व मुलीच." ग्रामसिंह गुरगुरले : "मला मुलगा नाहीं. मुलगीच दिलीय् देवानें.". मास्तींनीं त्याच्या बोलण्यांतील निराशेचा सूर ओळखला. "छे, छे, तसें मानूं नका. मला मुलींमुळें मुळींच खंत नाहीं. त्या लोकमातेच्या अंशच आहेत. लोकमाता आदिशक्ति आमची आई होऊन, पत्नी बनून, मुलींच्या रूपानें आम्हांबरोबर नांदायला येते. आमच्या वांट्याला त्याच लोकमातेच्या विभूती आहेत." भगवंताचें अधिष्ठान मास्तींना एक प्रतिपादनाचें तत्त्व वाटत नाहीं; तें प्रतीतीचें, स्वानुभवाचें, सुखानुभवाचें सत्य वाटतें! यापुढें मुलींच्या लग्नाच्या गोष्टी निघाल्या. मास्तींनीं म्हटलें : "एका मुलीचें लग्न होऊं घातलें आहे. ती एम्. एस्सी. शिकत आहे. आतां बेंगळूरला परत गेल्यावर माझा, नव्हे आमचा, तें उरकून टाकण्याचा विचार आहे!" या बोलण्यांत मास्तींनीं स्वतःला सांवरून घेतलें, 'मी' चें 'आम्ही' केलें तें कां? या सर्वनामशुद्धीकरणांत त्यांच्या अंतःकरणाची संस्कृति व आत्मशुद्धि प्रकट झाली. त्यांना आपल्या पत्नीची, दूर बेंगळूरला राहिलेल्या त्या सहधर्मिणीची आठवण झाली. ते गोकर्ण मुक्कामीं एकटेच बसून बोलत होते. त्यांना वाटलें, लग्न मीं करवितों असें म्हणणें धर्मपत्नीशीं प्रतारणा करणें आहे, तिचा उचित उल्लेख तिच्या अनुपस्थितींतहि करणें आपला धर्म आहे. त्या धर्मपालनाखेरीज त्यांच्या अंतःकरणाला तृप्ति नाहीं. गोष्ट लहानशी, पण तीच क्षणिक चमकणाऱ्या विजेसारखी त्यांच्या एकंदर चारित्र्यावर एकदम झोत टाकून गेली!

कांहीं वर्षांनंतरची गोष्ट. आमच्या शाळेच्या वार्षिकोत्सवासाठीं मास्ती अध्यक्ष म्हणून आले होते.










तेव्हां त्यांचा खरा 'सह'वास मला तीन दिवस घडला. मीं त्यांना सभेंत ऐकलें; खासगी बैठकींत पाहिलें; वेळींअवेळीं "येतां जातां......वदनिं वदतां ग्रास गिळितां" दुरून-जवळून बोलून-चालून बघितलें. मला त्या सौजन्याच्या व सौहार्दाच्या पुतळ्यांत कुठेंहि एक फुटीर रेखा, एक खांच किंवा खवली निघालेली आढळली नाहीं. तेंच अव्यंगसुंदर, अनिंद्यमनोहर, निर्व्याज मोहक व्यक्तिस्व सर्वांशीं व सर्व-अंशीं व्यक्त होत होतें. अष्टौप्रहर अभिनय करणें, निरंतर 'पावित्रा' टाकून व 'मुद्रा' धारण करून वावरणें शक्य आहे का? विवेक व विनय हेच काय ते 'विकार' त्यांच्यांत दिसून येतात! बालक, बैरागी, राजकारणी, व्यापारी, विद्यार्थी, ग्रामवृद्ध, कोणीहि त्यांच्यासमोर आला तरी त्यांचा व्यवहार सारखाच सलोख्याचा, कौतुकाचा, सहानुभूतीचा व समदर्शी असून, हृदयस्पर्शी, वडीलकीचा व आपुलकीचा असे. आपली श्रेष्ठता त्यांना स्थापित करावी लागत नसे. तसेंच, त्या श्रेष्ठतेचें कोणाला दडपणहि वाटत नव्हतें. कोणताहि मनोगंड न बाधलेला माणूस माझ्या आयुष्यांत हाच तो एक मीं पाहिला! त्यांची 'मृगेंद्रता' (अर्थात् नरेंद्रता!) 'विक्रमार्जितसत्त्व' नव्हे, तर 'सत्त्वार्जितविक्रम' आहे! आपल्या साहित्यिक स्थानमानाची यथार्थ जाणीव व अभिमान त्यांना होता. फाजील विनय त्यांना मुळींच बाधत नव्हता. पण त्याबरोबरच त्यांच्या अभिमानाला व आत्मगौरवाला कोठलाहि उग्र दर्प येत नसे. जे शब्द व आविर्भाव इतरांच्या तोंडीं गर्वाचे ठरले असते तेहि त्यांना शोभून जात! "मला दोनशें प्रामाणिक कार्यकर्ते द्या; मी कर्नाटकाचें एकीकरण घडवून दाखवितों!"—ते एकदां माझ्याजवळ म्हणाले.—एका सभेंत त्यांचा परिचय मीं करून दिला. परिचयाच्या त्या भाषणांत औपचारिकतेपेक्षां औचित्य व गुण-ग्रहण जास्त होतें. स्तुति, तीहि यथार्थ व योग्य व्यक्तीकडून कुणाला आवडत नाहीं? मास्तींना तर ते म्हैसूरी सरंजामी थाटांत वाढल्यामुळें प्रशंसा व सत्कार मनस्वी आवडे. माझें भाषण संपतांच ते हंसतमुख होऊन बोलले: "तुमचें हें भाषण लिहून काढा. कुठल्याहि मासिकांत प्रसिद्ध करा. नाहीं तर आमच्या 'जीवन' मासिकांतच द्या. ही पण एक साहित्यसेवाच होय. ही माझी नव्हे, कन्नड साहित्याची प्रशंसा आहे."—या त्यांच्या प्रांजल बोलण्यांत गर्वाचा गंधहि नव्हता. इतक्या अलिप्तपणानें ते बोलले. इतरांनीं तेच उद्गार काढले असते तर त्यांना ते पचले नसते. पण मास्तींमध्यें असा कांहीं गोडवा व गौरवयुक्त शालीनता आहे कीं, त्यांनीं आपली स्तुति आपणच करून वा करवून घेतली तरी ती वावगी वाटत नाहीं.

त्यांची बुद्धि फारच विचिकित्सक आहे, पण व्यतिरेकी किंवा अतिरेकी नाहीं. आपल्या परिसरांतील व्यक्ती व वस्तुवैचित्र्यें ते टिपून घेण्यांत जागृत असतात. आमच्या मुक्कामीं एक तरुण त्यांच्यापुढें आला. त्यांनीं विचारलें, "काय रे, तूं काय शिकतोस?". तो म्हणाला, "मी मॅट्रिक पास झालों आहे." त्यांनीं पुन्हां प्रश्न केला, "तूं कॉलेजला कां गेला नाहींस?". तो ओशाळून म्हणाला, "घरची गरीबी, सर".—मास्ती जरा निष्ठुरपणेंच उद्गारले, "गरिबी असली म्हणून काय? कुठें हॉस्टेलमधें वा हॉटेलमधें पडेल तीं कामें करून जेवणापुरतें कमावून कां शिकला नाहींस?". तो मुलगा गप्पच राहिला. मास्तींनीं खोदून विचारलें, "कां तसलीं कामें करायला शरम वाटली?". तेव्हां तो मुलगा गहिंवरून म्हणाला, "नाहीं, सर. माझे आईबाप म्हातारे. पाठचे भाऊ आहेत. त्यांनाहि शिकायचें आहे. मीं लौकरच नोकरी धरली तरच त्यांचा निर्वाह व्हावयाचा. त्यांना मी शिकविणार आहे." "होय का?" मास्तींचे डोळे पाणावले "तर मोठा माणूस बाबा तूं! तुझें ध्येय मोठें." त्याला असें म्हणतांना त्यांनीं त्या तरुणाची पाठ थोपटली अन् त्याला हात जोडले! सामान्यांची असामान्यता ओळखणें याहून मोठेपणाची साक्ष ती कोणती?

साहित्यांत चमकण्याबरोबरच ते नेटका प्रपंच साधून व्यवहारांतहि चमकले. म्हैसूर सिव्हिल सर्विसमध्यें मानाचीं स्थानें त्यांनीं आक्रमिलीं. तिथें-हि त्यांची दृष्टि सहानुभूतीची, मानवसेवेची व

वृत्ति स्वाभिमानाची राहिली. कमिशनरच्या हुद्द्यावर असतां त्यांचा हाच दण्डक असे कीं, आपण कुठल्याहि 'तहसील'-( जिल्हा )-कचेरीला तपासणीसाठीं भेट दिली तर तिथल्या नोकरवर्गानें उठून उत्थापन देतां कामा नये, आपापल्या मेजावरील काम करीत असावें. त्यांना लांगूलचालन, लांचलुचपत, लाळघोटेपणा कधींहि खपला नाहीं. त्यांच्या उभ्या 'अम्मलदारीं' त चाकराकडून आपल्या पायाचे बूट त्यांनीं काढविले किंवा चढविले नाहींत. व्यक्तिगौरव त्यांच्यांत मुरला आहे. उच्च अधिकारावर असो, 'राजसेवासक्त' ही उपाधि लाभल्यावर असो, कन्नड साहित्य परिषदेच्या स्थायी उपाध्यक्ष स्थानावरून असो, कोणत्याहि सत्कारसमारंभीं असो, थोरामोठ्यांपुढें असो, बायकामुलांमध्यें असो, कुठेंहि, केव्हांहि ते साधे, सात्त्विक व समाधानीच असतात. गर्व, गौरव व गुणज्ञता यांचा मनोज्ञ संगम त्यांच्यांत नेहमीं आढळतो. कुणाहि माणसाशीं अत्यंत आदरानें तशाच आपुलकीनें ते वागतात. त्यांचें पूर्ण नांव आठवून ठेवतात. अभिधानांच्या आधुनिक आद्याक्षरी उपयोगावर त्यांची श्रद्धाच नाहीं ! व्यक्तिगौरवाचेंच हें सूक्ष्म लक्षण होय. त्यांच्यांत कुठल्याहि मताचा, तत्त्वाचा आग्रह किंवा आवेश नाहीं. अनुद्वेगकारी उक्तिच जर साहित्य, तर मास्तींचा सर्व आचार, विचार व उच्चार साहित्यच होय !

त्यांना 'उपाधि' लाभली. पण त्या 'राजसेवासक्त' या उपाधीची त्यांना हल्लींच्या शिरस्त्याप्रमाणें शरम वाटत नाहीं. त्याविषयीं मोह वा मद न बाळगतांहि ते त्याचा योग्य अभिमान मानतात. त्याविषयीं कन्नड पुरोगामी लेखकांनीं ( ज्यांना 'प्रगतिशील' असें ओळखतात ) पुष्कळ टीका व थट्टा केली. ती त्यांना आवडली नाहीं. शेक्सपिअरचे शब्द वापरून ते अशाच एका प्रसिद्ध पुरोगामी निंदकाबद्दल माझ्याजवळ म्हणाले होते : "He is insulting me with the licence of ink". तरी पण ती पदवी राजनिष्ठेची खूण म्हणून त्यांनीं स्वीकारली नाहीं. आपण होऊन म्हैसूर महाराजांकडे ते कधींहि गेले नाहींत. त्यांना वाटे कीं, म्हैसूर संस्थानाच्या दृष्टीनें राजसेवा व राज्यसेवा एकच. "आपण सरकारी व साहित्य-क्षेत्रांत लोकसेवाच मनोभावानें केली. ती लोकांना मंजूर झाली. ही पदवी किंवा उपाधि त्या लोकमान्यतेचीच खूण व प्रशस्तिपत्रिका होय. कारण, येथें राजाच कन्नड संस्कृतीचा व लोकजीवनाचा प्रतीक व प्रतिनिधि आहे" ही मास्तींची मनोमय समजूत आहे.

## सर्वसमन्वयी सहिष्णुता

मास्तींचा पिंड आर्यपरंपरेनें, आर्ष संस्कारानें पोसला गेला आहे. वैष्णवपंथाची, भागवत धर्माची सर्वसमन्वयी सहिष्णुता त्यांच्यांत बाणली आहे. त्यांना तामिळ वैष्णवभक्त जितके जवळचे तितकेच खिस्ताच्या 'जुन्या करारां' तील डेव्हिड राजा व त्याच्या प्रार्थना प्रिय वाटतात. रामकृष्ण परमहंस जेवढे पूज्य तेवढेच रवींद्रनाथ श्रद्धेय वाटतात. मार्कस् आरेलिअस् जसा आवडता व आदर्शप्राय, तसेच कनकपुरंदरादि कन्नड वैष्णव 'दास' आदरणीय वाटतात. त्यांनीं 'विमर्श' नांवानें जे निबंध लिहिले त्यांत या सर्व विभूतींचें मार्मिक गुणग्रहण व भक्तियुक्त परिचय आला आहे. रवींद्र रामकृष्णांचीं तर त्यांनीं हृदयंगम चरित्रेंच लिहिलीं आहेत. तेवढ्यासाठीं मूलग्रंथांची ओळख करून घ्यायला ते थोडेंबहुत बंगाली शिकले. त्यांना कुठच्याहि मताचा किंवा मठाचा पक्षपात नाहीं. सत्याचा आग्रह धरूनहि ते सत्याग्रही नाहींत ! त्यांच्या वाणींत सत्य कधींहि अप्रिय होत नाहीं. त्यांच्या प्रतिपादनांत हेतुवाद, हेत्वाभास, हटवादीपणा, कटुता किंवा कोटिबाजपणा कांहींच नसतें; तरीहि तें आकर्षक, प्रभावी व प्रसन्न असें वठतें. अशी वाणी मीं मराठींत देखील पाहिलेली विरळाच. वामन मल्हार, न. चिं. केळकर व साने गुरुजी यांच्या विशिष्ट गुणांचा त्रिवेणीसंगमच जणूं मास्तींची भाषा व शैली ! बौद्धतत्त्वाविषयींहि त्यांना अपार आत्मीयता वाटते. तथागत कपिलवस्तूला परतल्या वेळच्या करुणगंभीर प्रसंगावर त्यांनीं रचलेलें 'यशोधरा' हें ललितसुंदर काव्यरूपक विश्वसाहित्यांतील एक अनमोल लेणें होय. त्यांच्या कथा सौंदर्य व मांगल्य यांच्या विविध छाया-छटांनीं

नटलेल्या आहेत. या बाबतींत ते पूज्य साने गुरुजींची आठवण करून देतात. पण गुरुजींचा प्रचारकी आवेश व भावविक्षोभाचा कमालीचा आवेग मास्तींत नाहीं. तसेंच, त्यांच्या पात्रसृष्टींतील जिवंतपणा व चांगुलपणा जास्त कणखर व खराखुरा वाटतो. पण त्यांच्या स्वभावाच्या मूळ सात्विकतेमुळें, कोणत्याहि उत्कटतेच्या अभावामुळें, त्यांचीं खलपात्रें हीं व्हावीं तेवढीं दुष्ट वठत नाहींत. तसेंच, त्यांचीं वीरपात्रें तेवढ्या क्षात्रोचित कठोरतेनें उठून दिसत नाहींत. त्यांनीं एक ऐतिहासिक कादंबरी व तीन ऐतिहासिक नाटकें लिहिलीं. कांहीं ऐतिहासिक कथाहि लिहिल्या. एक नाटक तर शिवछत्रपतींच्या चरित्रावरच रचलें आहे. पण तेथेंहि नायकपात्रामध्यें वीरोचित तेजस्विता जरा कमीच आढळून येते. बुद्धिप्रवण कोमलतेचा मधुर रंगच पात्रचित्रणांत जास्त भरलेला दिसतो. आविष्कापेक्षां सुकुमार प्रयोगाकडे, ओजापेक्षां माधुर्याकडे मास्तींची लेखणी कलते. पण हा दोषहि गुणातिरेकामुळेंच. ते स्वतः धीर-शांत व धीर-ललित यांच्या सीमेवर उभे असलेले नायक ! तेव्हां त्यांची शैली त्यांच्या शीलाची छाया व्हावी हें साहजिकच होय.

धर्मनिष्ठा व आस्तिक्य त्यांच्या हृदयांत अचल व अक्षय आहेत. पण त्यांची श्रद्धा ही वाळूखालील झऱ्यासारखी जरा पोखरली तरच वर येणारी, अशी आहे. बुवाबाजी, भक्तीचे देव्हारे माजविणें, कर्मकांडी अवडंबर किंवा पूजा-अर्चेचें आडंबर त्यांच्यामध्यें नाहीं. "मला पुष्कळ मित्रांनीं पाँडिचेरीला व अरुणाचलास आपल्याबरोबर यायला सांगितलें, आग्रहच धरला. पण मी गेलों नाहीं. माझी निष्ठा जर खरी असेल तर माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं गुरु अरविंद किंवा रमण महर्षि माझ्या घरीं येतील" असें त्यांनीं म्हटलें होतें. चमत्कार असा कीं, त्यांना दोघेहि महापुरुष स्वप्नीं भेटले ! दोघांच्याहि आश्रमांत जाऊन त्यांचें दर्शन घेतल्याचा दृष्टान्त मास्तींना झाला ! दोन्हीं गुरुधामांची यात्रा करून आलेल्या आपल्या मित्रांना मास्तींनीं, बेंगळूरला बसवनगुडींतच बसून, त्या आश्रमांच्या बारीक खुणा जेव्हां सांगितल्या व आपल्या स्वप्न-संदर्शनाची हकीगत निवेदन केली तेव्हां सुखासुखीं साक्षात्कार पावणाऱ्या या 'सेक्यूलर' साधूविषयीं त्या मित्रांना हेवा वाटला कीं नवल वाटलें, त्यांचें तेच जाणोत !

## रामायण-महाभारताचा प्रभाव

मास्तींची प्रतिभा वाल्मीकि व व्यास यांच्या गाढ संस्कारांनीं उजळली आहे. रामायण व महाभारत हे त्यांच्या साहित्यिक आत्म्याचे दोन डोळे आहेत ! त्या महाकाव्यांच्या रससमुद्रांत असंख्य बुड्या मारून ओंजळी भरभरून वर आणलेल्या हिऱ्या-मोत्यांनीं त्यांनीं आपल्या 'हृदयाची श्रीमंती' वाढविली आहे. कन्नड जनतेच्या संस्कृतींत या दोन महाकाव्यांच्या धारा ओतप्रोत भरलेल्या त्यांना आढळतात. "मी कुठेंहि गेलों तरी सांगायच्या गोष्टा याच दोन : कन्नड संस्कृति व रामायण-महाभारत" असें ते सरळ सांगून टाकतात. त्यांची त्या महाकाव्यांविषयींची अमोघ ओघवती वाग्मिता ऐकूनच धन्य व्हावें. रामायणाचा रसास्वाद करून देणारा त्यांचा छोटा ग्रंथ— 'आदिकवि वाल्मीकि' हा रसिकांनीं अवश्य वाचावा. त्यांत वाल्मीकीची तशीच मास्तींचीहि प्रतिभा सारखीच प्रत्ययाला येते. हा ग्रंथ इंग्रजींतहि उपलब्ध आहे. त्या तोडीचें पुस्तक तेंच एक होय ! श्री. चिंतामणराव वैद्य यांचें 'Riddle of The Ramayana', नेकनामदार शास्त्रींचें 'Thirty Lectures on Ramayana', श्री. भास्करराव जाधवांचे लेख इत्यादि मीं वाचले आहेत व वाचून प्रभावितहि झालों आहे. पण मास्तींच्या पुस्तकाची अवीट गोडी त्यांना नाहीं, असें म्हणण्याचें साहस मी करतों. काव्य या दृष्टीनें, रसग्रहणाच्या हेतूनें या पुराणग्रंथांची समालोचना मास्तींनींच काय ती केली. तो एकच ग्रंथ त्यांच्या कीर्तीला पुरेसा होता !

"खरा साम्यवाद भारतांत आहे. मी पण साम्यवादावर पुस्तक लिहिणार आहे. पण तो भारतांतील साम्यवाद. तेव्हां समाज जिवंत होता. त्यामध्यें रक्तसंचार अनिरुद्ध चाले. तसा समाज व तसा समाजवाद पुनः स्थापित व्हावा" असे उद्गार त्यांनीं मजजवळ काढले होते. हल्लीं भारतांतील पात्रचरित्रें रेखाटणारा त्यांचा








' भारततीर्थ ' नावाचा ग्रंथ प्रकट झाला आहे.

रामायण-महाभारतांच्या खालोखाल त्यांचा शेक्सपिअरचा अभ्यास सखोल आहे. उपनिषदें, गीता व कालिदास यांचाहि त्यांचा व्यासंग दांडगा आहे. त्यांच्या दोन सुप्रसिद्ध कथा कालिदासाच्या प्रतिभेला दोन खिलपर्व जोडल्यासारख्या आहेत !—एक 'शकुंतलेचें पुनरागमन' व दुसरी "**गौतमीची गोष्ट**". गीतेविषयीं त्यांचे कांहीं मौलिक विचार आहेत. त्यांच्या मतें गीतेंतील उत्तमपुरुषप्रयोगी श्लोक मूळचे नसावेत, श्रीकृष्णाचें अवतारित्व प्रस्थापित झाल्यावर हे श्लोक गीतेंत समाविष्ट झाले असावेत. या मतानुसार मास्तींनीं मूळ गीता संशोधून लिहिली आहे.

जीवनाच्या दैविकतेचा जणूं त्यांना साक्षात्कार झाला आहे सर्वत्र ते मांगल्याचा आविर्भाव किंवा आविष्कार पाहतात. त्यांची भक्ति खुळ्या भावोद्रेकानें लिडबिडलेली नाहीं. त्यांचीं प्रणय-वर्णनें थिल्लर वा अवखळ उन्मादाचीं नाहींत. त्यांचीं दोन खंडकाव्यें–' गौडांची मल्ली ' व ' राम-नवमी '–हीं अवश्य वाचावींत. त्यांत हा मंगलो-न्मुख सात्त्विक प्रेमभाव अत्यंत हृद्यपणें प्रकट झाला आहे. मखमलीच्या झग्याला रेशमाचें ' लाइनिंग ' असावें तशी ही त्यांची भक्तिपरायणता व पावित्र्यभावना सौम्य तेजानें त्यांच्या साहित्याचें ' अंतरंग ' बनून राहिली आहे. व्यक्तीविषयीं नितान्त आदर, निसर्गाविषयीं निस्सीम प्रेम व जीवनाविषयीं अगाध श्रद्धा त्यांच्या समस्त वाग्व्यवहाराला उजाळा व तजेला आणतात. इतर श्रेष्ठ साहित्यिक आपल्या Knowledge नें व Power नें आम्हांला दिपवितात, तर मास्ती हे प्रीतिस्निग्ध ' शिव ' व ' सुंदर ' यांनीं, Wisdom नें व Grace नें आम्हांला पुलकित करतात.

ते सभेत बोलूं लागले कीं, आपल्या निराडंबर मितालंकारी ललितमधुर भाषेनें सारा श्रोतृसमुदाय आपलासा करून घेतात. कुणी प्रेमळ वडील आपल्याशीं हितगुज करीत आहेत असें वाटायला लावणारा मनाचा मोकळेपणा व शब्दांचा गोडवा—यांमुळें ते हळूहळू एक विलक्षण आत्मीयतेचें, वक्त्या-श्रोत्यांच्या तादात्म्याचें वातावरण निर्माण करतात. हा नुसता भास नव्हे. त्यांच्या प्रासादिक वाणीनें लावलेला ध्यासच तो ! इंग्रजी वक्तृत्व मीं त्यांचें ऐकलें नाहीं. त्यांचें कन्नड भाषेंतील वक्तृत्व ज्यांनीं ऐकलें असेल त्यांची साक्ष माझ्या विधानाला अनुकूलच पडेल. मास्तींना उपमा-रूपकांच्या द्वारा आपली मतें बिंबविण्याची श्री. राजाजींसारखीच विलक्षण आवड व हातोटी आहे. त्यांच्या कांहीं उपमा अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहेत. पौराणिक कथाप्रसंगांचा प्रतीकात्मक उपयोग करून ते आपल्या विचारप्रतिपादनांत बहारीचा प्रभाव ओढूं शकतात. उदाहरणार्थ, भारतांतील यक्ष-प्रश्नाची कथा लोकविख्यात आहे. तीच कथा मास्तींच्या हातीं प्रचलित जागतिक परिस्थिति व आपल्या देशाचें ' मिशन ' घोषित करणारें रम्य रूपक बनूं शकतें. भारतच युधिष्ठिर. यक्षच काल-पुरुष. इतर राष्ट्रें त्या Time Spirit चें आव्हान अवहेलून मूर्च्छित पडलेले पांडव. असा सांगाडा सिद्ध होतो. जुनी कथा एक सनातन प्रतीक बनते !—तसेंच, किरातार्जुनीयाची कथा. मास्तींना नित्य जीवनांतच तो देवमानवांचा संघर्ष दिसतो. आम्हीच अर्जुन. आमचा शत्रु, प्रतिस्पर्धी हा आमच्या सत्त्वपरीक्षेसाठीं किरात बनून आलेला ईश्वर. जीवनकलह म्हणजे आमचा देवाशीं अहर्निश चाललेला संघर्ष ! कशी आहे कल्पना ? पूज्य विनोबा किंवा काका कालेलकर यांची आठवण होते, नाहीं ?

### विविध साहित्य

मास्तींनीं पुष्कळ कविताहि लिहिली आहे. तीहि सुनीत, मुक्तछंद, वृत्तबद्ध जुन्या-नव्या छंद-प्रकारांतून रचलेली आहे. काव्यबद्ध कथा, नाटकें, पुराणप्रसंग सर्व कांहीं त्यांनीं लिहिलें आहे. अशा नाटकांपैकीं रवींद्रांचें ' चित्रा ' हें काव्यरूपक मूळ बंगाली छंदच शक्य तों अनुसरून त्यांनीं कानडींत लिहिलें आहे. तसेंच, स्त्रीभीरु ऋष्यशृंगाचें पात्र त्यांच्या कविमनाला आवडलें. त्यावर त्यांनीं 'शांता' नांवाचें लहानसें नाटक लिहिलें. तसेंच त्यांनीं दोन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. एक फार पूर्वीं लहान व कौटुंबिक; दुसरी, हल्लीं म्हातार-पणीं मोठी व ऐतिहासिक. पण दोन्ही आपल्या










## श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार

परींनीं उत्कृष्ट कलाकृती आहेत. पण त्यांच्या यशाचा खरा मनोरा त्यांच्या लघुकथांनींच रचला. कथा सांगावी मास्तींनींच. त्यांच्या सर्वच लघुकथा इंग्रजींत त्यांनींच आणल्या आहेत. पण माझे विद्वान् मित्र प्रा. गोकाक यांनीं एकदां म्हटल्याप्रमाणें : " He has done himself an injustice by rendering them into English of peculiar simplicity ". त्या इंग्रजीचा सहेतुक सरळपणा कांहीं अंशीं त्या गोष्टींच्या रंग-संगतीचा व छायाविलासाचा विचका करतो. कन्नड लघुकथेचे ते ' आदिकवि ' आहेत. त्यांच्या अगोदर कुणीं तरी पहिली कथा लिहिली असेल. पण अमेरिगोनें जरी ' नवें जग ' आधीं गांठलें तरी अमेरिकेच्या शोधाचें सारें श्रेय कोलंबसलाच ' जुनें जग ' देतेंच कीं नाहीं ? तसेंच, कन्नड लघुकथा-बालिकेचे जनक कुणीहि विश्वामित्र असो; तिचें संगोपन व सर्वांगसुंदर संवर्धन करून तिला लावण्यलतिका बनविली या कण्वांनींच !

तसेंच त्यांनीं आणखी एका व्यक्तीला आपल्या हृदयाचा आश्रय देवून पुढें आणलें. ती व्यक्ति कन्नडाचे कवींद्र श्री. बेन्द्रे हे होत. रत्नपारखी मास्तींनीं बेंद्रे यांना ओळखलें, हृदयाशीं धरलें व कांहीं वर्षें त्यांच्या प्रपंचाला सक्रिय हातभारहि लावला. बेंद्रे त्यांना वडील भाऊ मानीत असून त्यांना ' अण्णा ' म्हणून संबोधतात. एका श्रेष्ठ कवीला साहाय्य करावयाची संधि आपल्याला लाभली, एक श्रेष्ठ कवि आपल्या बंधुप्रेमानें बांधला जाण्यास कबूल झाला, आपला थोडा तरी पैसा सत्कारणीं लागला, यांतच त्यांना धन्यता वाटली. या धन्यतेच्या विनयानें, अशा समाधानानें तेच बेंद्रेंचे जणूं आपलें साहाय्य स्वीकारल्याबद्दल कृतज्ञ राहिले ! बेंद्रेंनीं या साहाय्याचा कृतज्ञतापूर्ण उल्लेख मास्तींच्या षष्ट्यब्दपूर्तीच्या सत्कार-प्रसंगीं दाटल्या कंठानें केला. तेव्हां मास्ती म्हणाले : " तुम्हीं मला कृतार्थ केलें. कोण कुणाचा परावलंबी ? तुम्ही-आम्ही सर्वच त्या ' पर ' तत्त्वावर अवलंबून जगतों. त्या ' परा ' नेंच माझ्याकरवीं तुमची सेवा घडविली ! " मास्ती तामिळ बोलणारे म्हैसूरचे स्थायिक; बेंद्रे मराठी बोलणारे उत्तर कर्नाटकाचे रहिवासी. पण दोघेहि कन्नड साहित्याला संजीवनी पाजणारे अश्विनीकुमार ठरले ! त्यांच्या बंधुत्वाच्या बाहु-पाशांत जागृत कर्नाटकाच्या अखंडतेची व साहित्य-धर्माच्या अविभाज्यतेची मिठी पडली व खऱ्या सहृदयतेच्या सीमोल्लंघनाचें दर्शन घडून आलें !

तसें पाहिलें तर मास्तींचा बहुश्रुतपणा तेवढा व्यापक नाहीं. साहित्याचे सर्व प्रकार त्यांनीं हाताळले; जीवनाच्या सर्व वस्तु त्यांनीं निवडल्या; ' नास्ति धीमतां कश्चित् अविषयो नाम ' ही कालिदासोक्ति त्यांनीं आपल्या परीनें सार्थ केली; कोणत्याहि राजकीय, सामाजिक वा साहित्यिक विषयावर ते मार्मिक, प्रामाणिक व मौलिक विचार बोलूं शकतात. तरी पण त्यांच्या प्रतिभेचा मूलकंद कवीचा व धर्मकथानिवेदकाचा आहे. त्यांच्या कथांची सारी खुमारी त्यांच्या निवेदनशैलींतच आहे. त्यांची निवेदनशक्ति तंत्रशुद्धीपेक्षां एक तऱ्हेची मंत्रसिद्धि प्रकट करते. लिहून काढण्या-पूर्वींच कांहीं वर्षांपासून त्यांच्या कथा कांगारूच्या पिशवींतील पिलांप्रमाणें त्यांच्या मस्तकांत संवाद, संनिवेश, पात्रचित्रें आदि तपशिला-सहित स्पष्टपणें जुळून सिद्ध असतात ! अवकाश मिळतांच त्या कागदावर उतरतात. पुढेंमागें लिहिल्या जाणाऱ्या गोष्टी ते आधींच आम्हांला बसून सांगूं शकतात. त्यांची ' गौतमीची गोष्ट ' अशीच मीं ऐकली होती. मला वाटतें हें त्यांचेंच वैशिष्ट्य. ते कथा स्वतः लिहीत नाहींत. त्यांच्या पत्नी त्या उतरून घेतात म्हणे. श्रीमती मास्ती तशा मोठ्या विदुषी नाहींत. तरी इंग्रजी चांगलें बोलतात व पतीच्या लेखन-भाषणांतील गुण-दोषांची-विशेषतः दोषांची-विचिकित्सा अचूक करतात. त्यांच्याशीं चर्चाविमर्श झाल्यावर ' आपण आपली कृति पूर्ण मानतों ' असें मास्ती म्हणतात. पत्नीचा यापेक्षां मोठा सत्कार तो कोणता ?

आधुनिक विश्वसाहित्य त्यांनीं फारसें वाचलें नाहीं. त्याबद्दल त्यांना खंतहि वाटत नाहीं. फार काय, जेम्स हिल्टन् किंवा समरसेट मॉम त्यांनीं वाचला नाहीं ! मॉमचें एकच नाटक-' Circle ' त्यांनीं वाचलें आहे. तरी








पण मास्ती कुठल्याहि साहित्यचर्चेत मागें पडलेले, ' out of date ' वाटत नाहींत ! हल्लीं सेवानिवृत्त झाल्यापासून ते ' जीवन ' नांवाच्या उच्च विचारप्रधान मासिकाचें संपादन व संचालन करीत आहेत. त्यांतील संपादकीय स्फुटें पाहावींत म्हणजे हा वयोवृद्ध ज्ञानी प्रचलित राजकारणावर, जागतिक व भारतीय पेंचप्रसंगांवर व जटिल-कुटिल प्रश्नांवर असे कांहीं सडेतोड, गोड व विचारप्रवर्तक अभिप्राय व्यक्त करतो कीं कुणालाहि वाटावें, हा लेखक आयुष्यभर वृत्तपत्रव्यवसायांत मुरलेला संपादक आहे !

मास्ती आपलें आत्मचरित्र—' भाव ' हें त्याचें शीर्षकहि त्यांनीं ठरवून टाकलें आहे— लिहिणार आहेत. कन्नड शारदेचें सारें ऐश्वर्य बेंद्रे? सारें श्रीमद्गांभीर्य पुटप्पा, चातुर्य श्रीरंग, औदार्य श्री. कारंत यांच्या कृतींत सांठविलेलें आहे, तर तिचें सारें चारित्र्य, पावित्र्य, व माधुर्य ' श्रीनिवास ' मास्ती वेंकटेश अय्यंगारांच्या कृतींत वा आकृतींत सामावलें आहे ! कांहीं कवी आपल्या कृतींपेक्षांहि थोर असतात.; कांहींच्या कृती त्या कवींपेक्षांहि महत्त्वाच्या निघतात. पण कवी व त्यांची कृति यांची अन्योन्य व अनन्याश्रयी थोरवी असणें साहित्याच्या इतिहासांत विरळाच. अशा धन्य कोटींतील एक ' कृति '— मास्ती वेंकटेश !

---

**श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार : अनु. श्री. गौरीश कैकिणी**

# गौतमीची गोष्ट

[ कविकुलगुरु कालिदासाचें ' शाकुन्तल ' विश्वसाहित्याच्या किरीटांतील एक उज्ज्वल रत्न होय. ' तत्रापिच चतुर्थोऽङ्कः ' असें ज्याविषयीं म्हटलें जातें, त्या चौथ्या अंकांत गौतमी प्रवेश करते व पांचव्या अंकांत ती प्रामुख्यानें आढळते. कण्व व आश्रमवासी युवयुवती या वृद्ध तापसीकडे गौरवानें बघतात. पण कालिदासाची ती एक ' उपेक्षिता ' आहे. या ' उपेक्षिते 'च्या प्रस्तुत सुरम्य कथेंत श्री. मास्तींची कल्पना कालिदासीय प्रतिभेच्या पातळीवर लीलेनें वावरतांना आढळून येते. त्या उपेक्षितेच्या अंतरंगांत शिरून तिच्या तपश्चरणपीडित शरीरावरील सुरकुत्यांमागील उत्कट प्रणयरम्य तारुण्याचें करुणकान्त व सात्त्विक सौन्दर्य लेखकाच्या प्रतिभेच्या 'यक्षकिरणा'नें उभें केलें आहे. 'Every saint has a past' ही ऑस्कार वाइल्डची उक्ति त्यांतील ' वाइल्ड ' पणा वगळल्यास, येथें समर्पक वाटते. —अनुवादक]

राणी शकुंतला आपल्या मुलासहित आपल्या दत्तकपित्याच्या आश्रमांत आली. त्या पहिल्या दिवशीं तिनें व तिच्या मैत्रिणींनीं सर्व रात्र गुज-गोष्टींतच घालविली. आपली जिवाची सखी आली या संभ्रमांत अनसूया-प्रियंवदा आपापल्या संसाराच्या योजना विसरून, आपल्या मुलांचे पाळणे हलविण्याचें काम आपल्या यजमानांकडे सोंपवून, शकुंतलेजवळ जाऊन बसल्या. त्यांची आजी गौतमी एकीकडे त्यांना बघत, दुसरीकडे आश्रमाचे र्व व्यवहार संभाळून घेत, तिच्या वयोमानाला असाध्य वाटणाऱ्या हौशी हालचालींनीं ऐटीनें वावरत होती ! संध्याकाळीं, सर्व कामें उरकल्यावर आश्रमवासी विश्रांतीला निघून गेले तेव्हां आजी-बाई या तरुणी बसल्या होत्या त्या कुटीच्या अंगणांत आल्या व त्यांच्या गोष्टींत सामील झाल्या.

प्रियंवदा आजीची थट्टा करीत शकुंतलेस म्हणाली, " बघ बाई, तूं आलीस अन् लगेच गौतमीआजी आजच्या दिवशीं एका महिन्याची धांवपळ व धांदल करून दाखवीत आहे. तूं येई








पर्यंत म्हातारी राहिलेली आमची आजी तुला बघतांच तरणी पोर बनली बघ, शकू ऽ ! "

अनसूया म्हणाली, "आजीला म्हातारी तरी कोण म्हणेल ? आजच नव्हे, केव्हांहि आम्हां तरुणीं-पेक्षां जास्त तडफीनें व हुशारीनें त्या राबतात. आज काय तो संभ्रम तेवढा जास्त, एव्हढेंच ! "

म्हातारी हंसली. "तुम्ही दोघीहि मोठ्या चतुर. गोड गोड बोलून मला चढवून, तुमचीं कामें माझ्याकडे सोंपवून तुम्ही आपल्या राजमैत्रिणी-बरोबर हितगुज करीत बसलांत ! तेव्हां मी तरी तरणीताठी न होऊं तर काय करूं ? "

प्रियंवदा परिहासानें म्हणाली, " तर मग, मी व अनसूया मिळून म्हातारीला तरुण बनविण्याची अजब औषधी हुडकून काढली म्हणायाची ! "

म्हातारी म्हणाली, " तें खरेंच, पण तें औषध तुम्हीं म्हटलेलें मात्र नव्हे. "

अशींच बोलणीं चाललीं. अनसूया-प्रियंवदांनीं लग्नें करावीं म्हणून आपण त्यांना छेडून, आग्रह धरून, त्यांचें मन कसें वळविलें याची गोष्ट गौतमीनें सांगावयाला सुरुवात केली. ' मुलींनीं लग्न करावेंच याचा म्हातारीनें आग्रह तरी एवढा कां धरला ? शकुंतलेनें दुष्यंताशीं दुःसाहस केलें, तसेंच याहि मुली परपुरुषांशीं आततायीपणा करतील, म्हणून तर नव्हे ? शकुंतला अप्सरेची मुलगी. ती कोणा तरी राजपुत्राची पत्नी होणार याच कल्पनेनें वाढ-विलेली. पण अनसूया-प्रियंवदा या आश्रमहरिणी तापसकन्या; त्यांची नजर संसार थाटण्याकडे थोडीच वळणार ! शकुंतलेंत चाळवलेला मनो-विकार या ब्रह्मचारिणींनाहि बाधेल अशी भीति बाळगण्याचें कारण नव्हतें. '—वगैरे वगैरे बोलणीं निघालीं. या चर्चेला वृद्ध तापसीनें धिम्म्या आबाजांत उत्तर दिलें : " मुलींनो, तुम्ही अजून अल्पवयी आहांत. या गोष्टी तुम्हांला सांगून कळायच्या नाहींत. ब्रह्मचर्यांत राहिलेल्या मुलांतहि शकुंतलेंत घडून आलेला मनोधर्म संभवूं शकेल. माझ्या लहानपणीं एका तरुणीला आलेला अनुभव मला माहीत आहे. तोच तुम्हांला सांगतें. तो ऐकल्यावर तुम्हीच कबूल कराल कीं, तुम्हां-विषयीं मीं धरलेली भीति योग्यच होती. "

तिघीहि मैत्रिणी आजीबाईंच्या समोर गोष्ट ऐकण्याच्या कुतूहलानें एकमेकांना बिलगून बसल्या. म्हातारीनें गोष्ट सांगावयास सुरुवात केली.

२

"ती मुलगी आश्रमांतील मुलांपैकींच होती. याच अरण्यापलीकडच्या एका गांवांतून ती आलेली. तुम्ही जशा पुढें इथें वाढलां तशी ती इथें वनलतेसारखी वाढली. आईला मुकलेलीं व बापाला भारभूत झालेलीं, पुढें बापच वाऱ्यानें जगालाच विटलेलीं, घरच्या मंडळींनीं धर्मसेवेसाठीं पाठविलेलीं किंवा आपण घरापेक्षां आश्रमांतच सुखी होऊं अशी आशा धरून आलेलीं मुलं इथें आश्रय घेतात. ही मुलगी पण तशीच इथें येऊन राहिली होती. आश्रमांतील दहा मुलांमधें त्यांच्याशीं मिळूनमिसळून ती वाढूं लागली. तिचें नांव मालिनी. आमच्या नदीचेंच नांव तें.

" राहायला आली तेव्हां ती आठ-दहा वर्षांची पोर. दिवसामागून दिवस जाऊं लागले, तशी मालिनी अंग भरून प्रौढ दिसूं लागली. त्या वेळीं आश्रमांत तिच्या वयाच्या दुसऱ्या कुणी मुली नव्हत्या. मुली होत्या; पण त्या हिच्याहून चार-सहा वर्षांनीं वडील किंवा तेवढ्याच वर्षांनीं धाकट्या. त्यामुळें आश्रमांत आल्यापासून ही मुलगी मुलां-मध्येंच मुलांबरोबरच विशेष वावरली, खेळली, फिरली. फुलें तोडणें, गवत काढणें, गुरांची निगा राखणें, आल्या-गेल्याची शुश्रूषा करणें—अशा सर्व कामांत मालिनी मुलांबरोबर मिसळून मुलांसारखीच वागूं व वाढूं लागली.

" तिचे सौंगडी झालेल्या मुलांपैकीं दोघे वयानें मोठे होते. एक भारद्वाज नांवाचा व दुसरा काश्यपाला दत्तक आलेला. भारद्वाज सोळा-सतरा वर्षांचा तरुण. दत्त काश्यप त्याच्याहून एक-अर्ध्या वर्षानें लहान. मालिनीहि दत्तपेक्षा वर्ष-अर्ध्या वर्षानें लहान. हि ...र या मुलांबरोबर वाढून मोठी झाली तरी आपण स्त्री आहों ही जाणीव तिला नव्हतीच. ते दोघे तरुणहि तिला आपला सोबती—एक पुरुष—असेंच जणूं मानीत व तिच्याशीं मोकळेपणानें वागत. ती वयानें वाढली



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तरी कोणताहि संकोच न मानतां ते तिच्याशीं सरळ व सहजपणें वागत होते.

" कण्वांच्या आश्रमांत ही चालचलणूक किंवा वागणूक कांहीं नवी नव्हे. पुरुषानें सदा आपण पुरुष म्हणून व स्त्रीनें सदा आपण स्त्री म्हणून परस्परांविषयीं एक नसती शरम व नसता संकोच अनुभवीत राहूं नये, ही इथल्या गुरुश्रेष्ठांची मनीषा. त्याचप्रमाणें आम्ही सर्व वाढलों. त्या मुलीला अन् तिच्या सर्व संवगड्यांना हा निःसंकोच निरागसपणा यत्न न करतां साधला होता.

" तरुणांबरोबर वावरणारी मालिनी उत्तम पोहायला शिकली. भारद्वाज त्या वेळीं आश्रमांतील सर्व मुलांमधें पोहण्यांत पट्टीचा पटाईत. दत्त काश्यप त्याच्या खालोखाल होता. त्याच्या एव्हढाच समर्थ पण त्याच्या तोडीचा म्हणवीत नसे व त्याच्यापेक्षां कमीहि म्हणतां येत नसे ! या दोघांबरोबर नदींत मनमुराद पोहून ती मुलगी आपल्या वयाच्या व योग्यतेच्या मानानें पोहण्यांत पट्टीची ठरली.

" तरुणांबरोबर या तरण्याताठ्या मुलीचें असें खेळतखिदळत राहणें पाहून, आश्रमांतील कुणीं तरी उपहासानें तिला विचारलें, ' पोरी, या दोघां तरुणांपैकीं तूं कुणाशीं लग्न करणार ? ' तेव्हांपर्यंत तिनें याचा विचार केला नव्हता. ती कल्पनाच तिच्या मनाला शिवली नव्हती. त्या खट्याळ प्रश्नाचें तिनें प्रत्युत्तर दिलें नाहीं. पण फिरून त्या तरुणांच्या संगतींत ती जाऊन उभी राहिली तेव्हां ' या दोघांपैकीं कुणाला बरें मी वरूं शकेन ? ' हा प्रश्न तिच्या मनांत उद्‌भवलाच. तिचें मन अनायासेंच भारद्वाजाकडे आकृष्ट झालें. दत्त नको, असें नव्हे. खरेंच, दोघेहि तिला सारखेच प्रिय होते. तरी पण ' लग्न कुणाशीं करूं ? ' म्हटल्यास 'त्यांतील मोठ्या ऋषिकुमाराशीं', असें तिचें मन सांगे !

" तेव्हांचे आश्रमाचे कुलपति महर्षि– त्यांच्या नंतरचे कुलपति म्हणजे आपले आत्तांचे कण्व ऋषीच–एके दिवशीं भारद्वाजाला बोलावून म्हणाले, ' दत्त आणि तूं त्या मुलीशीं फारच सलगीनें वागून वाढलांत. ती बाला आतां प्रौढ झाली आहे. तूं तिच्याशीं लग्न करून गृहस्थाश्रमी बनणें श्रेयस्कर. '

" भारद्वाजानें ' नाहीं ' म्हटलें नाहीं. तो न बोलतां बाहेर पडला. नंतर मालिनी जेव्हां जवळ आली, तेव्हां कांहीं अडखळल्यासारखें वाटून तो बघूं लागला. तोंपर्यंत संवगड्यासारखा वाटणारा जीव त्याच दिवशीं त्याला स्त्री असल्याचा भास झाला असावा. हिच्यापुढें, हिच्यासवें जपून वागावें, असेंहि त्याला वाटलें असावें. तरी पण तो कांहींच बोलला नाहीं.

" ती मुलगी तर दोघांशींहि पूर्वीच्याच सरलतेनें वागत होती. तरी पण भारद्वाजाकडेच तिचा कल वाढूं लागला होता.

" भारद्वाजाच्या मनाची पण तिच्याकडे ओढ वाढत गेली. एकदां ते दोघेहि नदींत पोहत होते. तेव्हां त्यानें मालिनीला विचारलें, ' माझ्याशीं लग्न करणें आवडेल का तुला ? '. मुलीनें ' हो ' म्हटलें. किनारा गांठल्यावर त्यानें दत्ताला ही गोष्ट कळविली. दत्ताच्या चेहऱ्यावर कुठें तरी थोड्या असमाधानाची छटा ढगाप्रमाणें सरकून नाहींशी झाली. आश्रमांत परतल्यावर दत्तानें ही बातमी इतरांना कळविली. कुलपतींनींहि ती ऐकली व ते ' ठीक ' म्हणाले.

" लग्न होणार असा त्या एकमेकांत वाङ्‌निश्चय झाला तरी आपसांत भारद्वाज व मालिनी दोघेहि नेहमींप्रमाणें वागत–वावरत होतीं. त्यांच्या जीवनाच्या पद्धतींत जो कांहीं अल्प फेरफार झाला तो इतकाच कीं, कधीं कधीं कुठें तरी जातांना दत्तासाठीं तिष्ठत उभें न राहतां तीं दोघेंचजण पुढें निघून जात असत. पुढें कधीं कधीं चांदण्यांत एकमेकांच्या सहवासांत दोघेंच सहल करीत. मालिनीला चांदण्याचें फारच वेड. मध्यरात्रींच्या टिपूर चांदण्यांत सारें रान हिंडून पाहून यावें, असा तिचें मन अनावर हट्ट धरी. सृष्टि उन्हाचें वस्त्र नेसते तसेंच चांदण्याचें वस्त्र ल्याल्यावर ती न्यारीच भासते, असें तिला वाटे. वृक्षवेली फुललेल्या असोत किंवा नसोत, चांदण्याच्या चंदेरी मायेंत कोणत्या तरी नव्य दिव्यतेनें त्या शोभून दिसतात, असा तिला अनुभव येई. अनेक







वेळां चांदण्या रात्रीं ती त्या दोघां तरुणांना हांक मारून ' रानींवनीं हिंडून येऊं ' असा आग्रह धरी. अशा वेळीं दत्त काश्यप येत नसल्यास भारद्वाजाला ती बरोबर घेऊन जाई.

" चांदण्यांत कांहीं तरी किमया आहे खास. त्या जादूनें भारलेलेच ती जाणूं शकतात. ती मुलगी त्या किमयेच्या जादूंत सांपडली. ती चांदवेडी बनली ! दत्त एक-दोनदां त्यांच्याबरोबर गेला व पुन: न जाण्याचें ठरवून मागें राहूं लागला. तिच्याबरोबर भारद्वाजहि चांदण्याच्या मायेंत सांपडून वेडा झाला. त्याला मालिनी फारच हवीशी वाटली. आपली व्हावीशी वाटली. चांदण्यांत तो तिच्याकडे उगीच टकमक बघत उभा राही. चांदणें हें मालिनीला सृष्टीनें परिधान केलेलें वस्त्र वाटे तर भारद्वाजाला तिनेंच ल्यालेलें तें उत्तरीय वाटे. प्रणयाची प्रेरणाशक्तिच चांदण्याचें लेणें लेवून आपल्यापुढें उभी आहे, अशी प्रचीति त्याला होई.

" नदीचें पाणी उतरल्यावेळीं किती तरी चांदण्या रात्रीं तीं दोघें नदीच्या डोहामधें असलेल्या हंसद्वीपावर जात. परस्परसान्निध्यांत, एकमेकांच्या साहचर्यांत चांदण्यांत जवळजवळ बसून, शरीराची सीमा उल्लंघून, तीं दोघेंजण सुखाच्या विदेहावस्थेंत मग्न होऊन जात. असाच कांहीं काळ लोटला असता तर त्यांचा विवाह घडून आला असता !

३

" पावसाळा आला. तुम्हांला माहीतच आहे मालिनी नव्या पाण्याच्या पुरानें कशी तुडुंब भरून वाहत असते ती. दरवर्षी श्रावणांतील दुथडी भरून वाहणाऱ्या नदींत उडी मारून पोहत पैलथडी गांठणें ही भारद्वाजाची एक मर्दानी हौस होती. त्याची इच्छा म्हणून दत्तहि त्याच्याबरोबर उडी मारून पोहत नदी पार करी. त्या वर्षी असाच पूर आला असतां पोहून नदी पार करावी, असा बेत भारद्वाजानें बोलून दाखविला. पण मालिनीला तें—कां कोण जाणें—नकोसें वाटलें. तिनें भारद्वाजाला आपला निषेध कळविला. त्यानें हंसून थट्टाच केली : ' लग्न झालें नाहीं, एव्हांनाच बायकांचा भ्याडपणा सुचूं लागला, होय ? गेल्या वर्षापेक्षां मी कांहीं यंदा म्हातारा झालों नाहीं। '

" पौर्णिमेच्या आदली रात्र ! आभाळांत नुकतेच कुठे ढग जरा दूर सरले होते. अशा वेळीं तीं दोघेंजण नदीच्या किनाऱ्यावर एका सहकार-वृक्षाखालीं जाऊन बसलीं. त्या चांदण्या रात्रीं, त्या शिलेवर, तीं प्रणयी हृदयें ऊर भरून वाहणाऱ्या त्या नदीच्या डोहाकडे डोळे लावून पुष्कळ गोष्टी बोलत बसलीं. त्या दिवसापर्यंत भारद्वाजानें मालिनीला प्रणयभावनेनें स्पर्श केला नव्हता. त्या रात्रीं त्यानें सहसा तिचें मुख आपल्या दोन्ही हातांनीं उचलून धरलें व तिचें चुंबन घेतलें. नदीचा प्रवाह जसा लतावृक्षांना खेंचून ओढून नेतो तसाच भारद्वाजाचा प्रणय तिचा सारा संकोच पार वाहून घेऊन गेला. ती त्याच्या बाहुपाशांत पडली. त्या क्षणीं भारद्वाज व मालिनी पति-पत्नी झाली !

" पुढल्या दिवशीं पहांटेच्या चौथ्या घटकेला दोघाहि तरुणांची पोहण्याची पैज जाहीर झाली. आश्रमांतील बहुतेक सर्व तरुण मंडळी नदीकांठीं जमली.

" दोघांनींहि पाण्यांत उडी टाकली. पाणी तुडुंब बेफाम वेगानें वाहत होतें. तुम्हीं बघितलेंच आहे, घाटाच्या वरच्या पायरीला पोहोंचल्यावर नदी जोरानें वाहत असली तरी स्तब्ध राहिल्यासारखी दिसते. मध्यभागीं तर पाणी तळ्याप्रमाणें शांत निश्चल सांठून राहिलें आहे असा भ्रम उत्पन्न होतो. पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत भरधांव पळणाऱ्या पालापाचोळ्यानें, शेवाळें-शाखोट्यांनींच काय तें पाणी धांवत असल्याचें समजून येतें. नदीच्या मध्यभागापर्यंत दोघेहि मित्र बरोबरच पोहत गेले. अगदीं मध्यें प्रवाहाच्या धारेच्या मधोमध ते आले. तेथें पाण्याची ओढ जबरदस्त होती. पोहणारानें तें पाणी एकदम कापून पुढें व्हावें, नाहीं तर पूर त्याला तितक्यांतच खेंचून वाहवून दूर न्यायला सरसावलेला होताच. भारद्वाज जरा पुढें सरसावला. दत्त मागें ...ला नदीमध्यें ती ओढ पार केल्यावरहि ... सांगितलें. राहिला व पलीकडे पोहोंचून होते. पण तोंडीं दत्त कांहीं वेळानें त्याला ... बिचारी आपल्या.








त्या पैलतीरावर सुमारें हजार पावलें चालून वर गेले व फिरून त्यांनीं डोहांत उडी टाकली.

" स्नानतीर्थाच्या वरच्या दिशेनें नदीच्या मधोमध योगशैल आहे; त्याला दुरूनच उजव्या बाजूनें वळसा घालून पोहून यावें लागतें. हल्लीं नदीचें पात्र किंचित् बदललें आहे. त्यामुळें योगशैल जरा बाजूला पडल्याप्रमाणें दिसतो. त्या वेळीं तो नदीच्या ऐन मध्यभागीं होता. त्या दिवशीं शिळेला वळसा घालून नदी पार करण्याच्या प्रयत्नांत भारद्वाज थोडा थकला असावा, असें दिसत होतें. त्यांची कसोटी पाहण्याकरितां कीं काय, ते पोहत होते त्या बाजूला वरून एक मोठा वृक्षाचा बुंधा त्यांच्याच दिशेनें वाहत येत होता. वाहून येणारा तो बुंधा दत्तानें आधीं पाहिला. तो लाकडाचा ओंडका, बुंधा सरळ भारद्वाजावर चाल करून येत असल्यासारखा दिसला. म्हणून दत्तानें ओरडून इशारा दिल्यासारखा आवाज ऐकूं आला. इकडे घाटावरून बघणाऱ्या मंडळींनींहि मोठ्यानें हांका मारून भारद्वाजाला सावध राहायला बजाविलें. मंडळींचें हें ओरडणें, हा इशारा भारद्वाजानें ऐकला असावा. पण ही आरडाओरड कशासाठीं हें मात्र त्याला समजलें नसावें. घाटावरची मंडळी नदीच्या वरच्या दिशेनें हातवारे करीत आहेत म्हणून त्यानें काय तें पाहायला त्या दिशेकडे मान वळविली. त्यानें मान वळविली तेवढेंच आम्हांला दिसलें! पुढच्या क्षणीं तो वाहत येणारा ओंडका भारद्वाजावरूनच चालून गेला! उपडा पोहत असणारा तो तरुण बुंध्याच्या एका फांदीच्या खालीं अडकून खोल पाण्यांत गेला तो परत वर आलाच नाहीं!"

गोष्ट सांगत असलेली वृद्ध तापसी येथें मध्येंच थांबली. " कोण बोलावतें आहे?" असें म्हणून चटकन् उठली व पर्णकुटीच्या बाहेर पलीकडे गेली.

प्रियंवदा म्हणाली, " आपल्याला तर कुणीच त्यांच्या ...रलेली ऐकूं आली नाहीं! आजीलाच कसें कण्व ऋषीच-ए...ारखें भासलें, कशास ठाऊक!" म्हणाले, ' दत्त आ...डे बघूं लागली. शकुंतलेनें सलगीनें वाकून वाढला...लविली. कांहीं निमिषां-

नंतर ती तापसी परत आली. तिची कथा पुढें सुरू झाली :

४

"काय झालें सांगतां येत नाहीं. बुंधा एका आडव्या शिळेशीं अडकला. भारद्वाज बुंध्याच्या फांद्यांमधें, बुंधा व शिळा यांच्यामधें, पाण्यांत गटंगळत राहिला. प्रत्येक क्षण एक घटका वाटूं लागली! दत्त त्याच्याकडे आडव्या हातांनीं पाणी कापीत झेप घेत जात होता. इकडे किनाऱ्यावरील लोकांनीं शिळेकडे धांव घेऊं म्हटलें तरी मध्यें खूप—हजार पावलें तरी अंतर तुडवीत जावें लागणार होतें. तरी तीरावरील कांहींजण जाण्यास उठले. कांहींनीं 'नको' म्हटलें. ' भारद्वाजाला काय धाड! तो चांगला दणकट आहे!' असेंहि कांहीं म्हणाले. शेवटीं तीरावरील दोघेजण किनाऱ्यावरून धांवत जाऊन पाण्यांत उडी घेऊन योगशैलाकडे भरधांव पोहूं लागले. पण ते पोहोंचण्यापूर्वींच दत्तानें प्राणावर उदार होऊन प्रयत्नांची शर्थ करून भारद्वाजाचा देह बुंध्या-फांद्यांतून सोडवून आणला होता व शिळेवर आणून टाकला होता. भारद्वाज निघून गेला होता! आश्रमासाठीं मागें राहिलें तें त्याचें केवळ कलेवर!

" किनाऱ्यावरून गेलेल्या दोघांनीं व दत्तानें मिळून भारद्वाजाचें शव घाटाला आणून पोहोंचविलें. या अनाहूत संकटामुळें कुलपतींना अत्यंत परिताप झाला. नानाविध अनुभव घेण्याकरितां ज्यानें देह धारण केला त्या आत्म्याची इतक्या तडकाफडकीं देहाशीं ताटातूट व्हावी ना! काय हा दैवदुर्विलास! असें वाटून कुलपति शोकानें व्यथित झाले. मृताच्या और्ध्वदैहिक क्रिया आटोपल्या. यापुढें कुणीहि भरल्या नदींतहि पावसाळ्यांतील अशी ही पैशाचिक पैज मारूं नये अशी मनाई कुलपतींनीं जाहीर केली. त्यापुढें तशी पोहण्याची पैज कुणी खेळलें नाहीं. पण म्हणून कांहीं गेलेला भारद्वाज परत आला नाहीं! झाला अनर्थ होऊन चुकला होता!

" भारद्वाजाला कांहीं तरी होत आहे असें दिसतांच इशारा देण्यासाठीं जे लोक ओरडले त्यांमधें मालिनीहि ओरडली होती. आदल्या रात्रीं










दोघेहि एकत्र बसले असतां त्यानें अर्धवट विनोदानें, अर्धवट गांभीर्यानें म्हटलें होतें : 'पाण्यांत असतांना मी तुझ्याकडेच पाहत राहीन. तुला भेटावें ही इच्छा मला किती सामर्थ्य देईल ! उद्यां नदीचें उल्लंघन साधलें तर त्यापलीकडे मी तुलाहि साधूं शकेन—होय ना ? आधीं नदी, नंतर नारी, त्यापुढें जीवन, त्याहि पलीकडे तपस्या—' असें तो म्हणाला होता. चार सिद्धींचा संकल्प सोडणाऱ्या ऋषिकुमाराला पहिली सिद्धीच साधतां न येतां हात टेकावे लागले ! नदी मालिनी मानवी मालिनीशीं जणूं सवतीमत्सरानें वागली ! त्या तरुणाला तिनें गिळून आत्मसात् केलें होतें !...

५

"तरुण भारद्वाज गेला ! त्याची गोष्ट संपली ! मागें राहिलेल्या मुलीचें काय झालें असेल याची खंत कुणालाहि नव्हती. खंत करण्याला कांहीं कारण आहे याची देखील जाणीव कुणालाहि नव्हती. कां असावी ? त्यांचें लग्न झालें नव्हतें. नवरा असला तरी त्याच्याविषयीं अतिरिक्त शोक करणें आश्रमभूमीच्या विरुद्ध व्यवहार ठरला असता. तेव्हां मुळीं लग्नच जिचें झालें नाहीं, अशा मुलीला शोक तो कशाला ? एका-दोघांनीं मुलीचें सांत्वन केलें. पण बहुतेक लोकांनीं तसें कांहीं मोठें घडलेंच नाहीं असेंच बोलून दाखविलें.

"झालें तें गेलें गंगेस, नव्हे नदी मालिनीस मिळालें असें लोकांनीं मानलें, तरी मालिनीला आपला जीवच निघून गेल्यासारखें वाटलें! चार वर्षांमागेंच त्यांचें लग्न होऊं शकलें असतें. पण तें घडलें नाहीं. पतिपत्नी न होतां, शारीरिक संपर्क न वाढवितां, पतिपत्नींच्या परिशुद्ध प्रेमाचा त्यांनीं विकास साधला होता. फुलांची वेणी बुचड्यांत माळण्याच्या अगोदर ती हातांत धरून तिच्याकडे बघूनच तिचा आस्वाद घ्यावा अन् सुखी व्हावें, आज संध्याकाळीं बाल भरतानें त्याला आम्हीं दिलेलें फळ खाण्याच्या अगोदर तें हातानें कुरवाळून नाकाशीं धरून हुंगून चुंबून त्याची मजा चाखली, त्याचप्रमाणें तीं दोघें जीवनाचें भरलें ताट पुढें ठेवलेलें असतां, जेवून घेण्यापूर्वीं, अनुरागानें त्याची गोडी वाढवीत होतीं. पण पानावर पाल पडावी अन् तोंडांतला घांस टाकून उठावें तसें त्यांचें जीवनाचें भोजन तसेंच राहून गेलें. तरुणाचें पुढें काय झालें हें इथें इहलोकीं समजणें शक्य नाहीं. मालिनी अभागिनी ठरली. रडली तर लोक हंसतील, या भयानें तिला रडण्याचीहि बंदी ! आणि खरेंच, तिला रडूंहि आलें नाहीं ! तिचा जीव एवढा गुदमरून गेला कीं, तिला रडतांहि येईना !

"दिङ्मूढ झालेली बिचारी मालिनी ! ती इकडे भारद्वाजाला गमावून बसली तशी तिकडे दत्तालाहि दुरावल्यासारखी झाली. लहानपणीं तिघेंजण एकत्र नांदत होतीं. पुढें दत्त जरा दूर झाला. स्नेहांत उणीव नव्हती, पण पहिल्यासारखेंहि राहतां येत नव्हतें. भारद्वाज जीवनांतूनच उठून चालता झाला व दत्त जीवनांत असूनहि दूरच राहिला. दत्त मागें एकत्र वागला-वावरला, आतां तसा, त्याच सलगीनें तो चालूं, वागूं शकत नव्हता. भावाप्रमाणें असूनहि भाऊ होऊं शकत नव्हता. मालिनी खरोखर एकटी पडली. आधीं कांहीं काळ तिला अहोरात्र भारद्वाजाची आठवण होई. त्याच्या पीळदार छातीची रुंदी, त्याच्या पाणीदार डोळ्यांतील धुंदी, त्याची धीरगंभीर चाल, त्या चालींतली ती ऐट—हीं चित्रें तिच्या डोळ्यांपुढें फिरफिरून जात. शेवटच्या रात्रीं तीं दोघें एकत्र बसलेला प्रसंग परत घडल्यासारखा वाटून ती तो आठवून आठवून कळवळून जाई. स्त्रीच्या कानाला पुरुषाचा आवाज केव्हांहि गोडच. पण त्यांत प्रेम मिसळलें गेलें तर त्या गोडीला नवीच एक लज्जत येते. त्या रात्रींच्या त्याच्या बोलण्यांतील ती अवीट लज्जत तिला पुनः पुनः आठवे. पतिपत्नी होणारें तें तरुण जोडपें एकमेकांना खेटून बसलें होतें. तें आठवून मालिनी सुखानें पुलकित होत होती. पोहत येत असतां आपल्याला बघून आपल्या प्रियकराला नवा जोम आला ही गोष्ट तिला पटली. दूर पाण्यावर तरंगणाऱ्या त्याच्या मुखावरील चमकणारे तेजस्वी डोळे कांठावर उभी असणाऱ्या आपल्यावर—आपल्याला आपण पाहिल्याचें तिला आजून सांगितलें. अमर असतो असें म्हणतात. तें व्हावें. पण तोंडीं वाक्य नव्हे. तें सत्य आहे. पण, बिचारी आपल्या-








सत्य, तितकाच त्याचा अंत व लोपहि सत्य होता. एवढें सत्य प्रेम असें खोटें ठरावें ना ! ती तरुणी व्याकुलतेनें वेडी झाली. तपोभूमींत हें वेड योग्य नव्हे हें खरें. पण हें वेड घडूं नये म्हणून तपोभूमीनें तरी तिला आपल्या प्रभावाचें रक्षण कां दिलें नाहीं ? रक्षण दिलें नाहीं एवढेंच नव्हे, तर ही तपोभूमि तिचें वेड वाढवीतच होती : 'तें हंसद्वीप. नेहमीं प्रमाणें त्या छोट्याशा बेटावर हंसांचीं जोडपीं एकत्र येतात. आपणहि तिथें आपल्या सहचराबरोबर जात असूं. आतां तो सहचर नाहीं. चकाकणाऱ्या पाण्याच्या दुभंगलेल्या डोहांत त्या दोघांहि युवयुवतींच्या छाया दिसतात. पण त्यांतील काया नाहींशी झाली. वेडी बनविणारी त्यांची माया तेवढी उरली आहे. किती भीषण जीवन हें !'

"शोकाचा आवेग अनिवार होऊन मालिनी एके दिवशीं हताश मनःस्थितींत एकटीच जाऊन नदींत पडली. तिला पोहणें चांगलें येत होतें. म्हणून मरणें सुलभ नव्हतें. प्रवाहानें तिला कांहीं अंतर रेटून नेलें. तिथें जवळच फुलपत्री तोडण्यासाठीं भटकत असलेल्या दत्तानें कुणी तरी नदींत पडल्याचा आवाज ऐकून पाण्यांत उडी मारली व तिला वर काढली. मुलीला शुद्धि आली. दत्ताला बघून ती म्हणाली, 'मला मरूं कां दिलें नाहींस ?'. दत्त बोलला : 'तें दैवाला अभिप्रेत नाहीं.'

"नको असलेलें जीवन परत हवेंसें मानून ती मुलगी आपलें आयुष्य जगूं लागली.

६

"दिवस चालले. महिने लोटले. अशीं दोन-तीन वर्षं लोटलीं. तरुणीच्या दुःखाचा उद्वेग ओसरला. स्मृतीनें होणारा क्षोभ एका परीनें शांत झाला. मालिनी आश्रमाच्या लोकांत मिळूनमिसळून मागच्यासारखीच सर्वांशीं वागूं लागली. दत्ताबरोबर तिचें पूर्वीसारखेंच मोकळेपणाचें वर्तन घडूं लागलें.

"दत्ताचें तपाचरण वाढत होतें. तपःशक्ति त्यांच्या [illegible]रलेली [illegible]. कुलपति त्याच्याशीं अतिशय कण्व ऋषींच-ए[illegible]रखें आश्रमवासी लोक त्यालाच भावी म्हणाले, 'दत्त आ[illegible]डे त्याच्याकडे विलक्षण गौरवानें सलगीनें वागून वाढला[illegible]

"एकदां वसंत आला. आपल्या सहकारवृक्षाला मोहर आला. जवळची नवमल्लिकेची वेल त्याला लिपटून चढून फुलून बहरली. तरुण मालिनीच्या मनालाहि नवी पालवी फुटली. या वेळीं तिच्या कांहीं अंधुक अपुऱ्या आशा अंकुरल्या. त्या आशा कोणत्या तें तिलाच बिचारीला समजत नव्हतें. एके दिवशीं आपण विनाकारण दत्ताकडे जात आहों असें तिला दिसलें. 'त्याच्या जवळपास जाण्याची ही ओढ आपल्याला कां ?'—त्या इच्छेचा तिनें निग्रह केला; मनाला दुसरीकडे वळविलें.

"वळविलें खरें. पण मन वळलें नाहीं. आपल्या अपेक्षेचें स्वरूप तिचें तिलाच उमगलें; त्या क्षणींच ती अपेक्षा तिच्यावरच सत्ता चालवूं लागली. चारसहा दिवस तिच्याशीं झुंजून शेवटीं मालिनीच हरली. आपला पति भारद्वाज होणार होता. तो योग चुकला. आतां दत्तच पति कां होऊं नये ? त्याला होतां येईल; व्हायला हवें. मरूं पाहणारीला त्यानें वांचवून आणलें. वांचविलेला जीव त्यानें कां सांभाळूं नये ?

"कांहीं दिवसांनंतर ती दत्ताजवळ तो एकटाच असतांना गेली. तो तिच्याकडे वळून 'काय, ताई ?' म्हणाला. त्याच्या आवाजांत आश्चर्याचा अंश होता. मालिनीनें फारसा संकोच न ठेवतां त्यानें आपल्याशीं लग्न करावें अशी त्याची प्रार्थना केली. 'ताई, तो विचारच नको'—दत्त निक्षून म्हणाला.

"याविषयीं त्यांचीं कांहीं बोलणीं झालीं. 'लहानपणीं आपण एकत्र वावरत होतों. भारद्वाजाऐवजीं तुलाच गुरूंनीं आज्ञा केली असती तर तूं माझ्याशीं लग्न केलें नसतेंस का ?' तिनें विचारलें. 'केलें असतें कदाचित्. दादानें 'हो' म्हटलें तसें मींहि 'हो' म्हटलें असतें. पण आतां कसें जमणार तें ? तूं माझी वहिनी झालीस. तुला मी वहिनी मानीत आलों आहे. आतां वहिनीला मी पत्नी मानणें शक्य नाहीं'—तो आग्रहानें म्हणाला. 'पण ही दादा-वहिनींची भाषा काल्पनिकच नव्हे का ?' तिनें परत विचारलें. तो म्हणाला, 'होय, कल्पनाच. पण ती कल्पना जीवनाच्या अगदीं खोल–अंतरंगापर्यंत खोलवर–








व्यापून राहिली होती. ती कशी टाळतां येईल ? ' दत्तानें मालिनीला बघावें तेव्हां प्रत्येक वेळां त्याला तिच्या उजवीकडे भारद्वाज उभा असलेला दिसे. तो भारद्वाज कांहीं कल्पना नव्हे. ज्या क्षणीं भारद्वाजाचें मालिनीशीं लग्न ठरलें त्याच क्षणीं ब्रह्मचर्याच्या बळें तपःसिद्धि कमावणें आपल्या जीवनाचा विधिसंकेत दत्तानें ठरवून टाकला. ' तुला प्रपंच नको ' असेंच जणूं दैवानें त्याला सांगितलें. दैवाचा कौल त्यानें चालवावा., तो चालवायला मालिनीवहिनीनें त्याला मदत करावी, असे विचार त्याच्या मनांत चालू होते.

" ' वरण्याला योग्य अशा दोघांपैकीं एकाला चुकवून दुसऱ्याशींच लग्न लावायला तोच विधि मला सांगत आहे ना ? ' चतुर मालिनीनें प्रश्न टाकला. दत्त उत्तरला, ' विधि काय सांगतो हें समजणें कठीण; आम्हांला जें आवडतें तेंच विधि सांगत आहे असा भ्रम करून घेणें जास्त सुलभ. चांगलें कोणतें तें ओळखून, तेंच विधीचें विधान होय, असें मानावें. "

' तर मग विधि मला काय सांगतो ' ?

' मागें मला ' लग्न करूं नकोस ' अशी विधीची आज्ञा झाली, तशीच ' तुला संसार नको ' अशी तुलाहि आतां आज्ञा झाली आहे. भारद्वाजदादांना दैवाज्ञा झाली त्याच दिवशीं तुलाहि दैवानं ही वाट दाखविली. त्याची इच्छा तुला आजपर्यंत कळून चुकली असावी अशी माझी समजूत होती. '

' तर मग ही आज्ञा, ही कामना विधीनें दिलेली नव्हे का ? '

' आशा म्हणजे एक साप असें गुरु म्हणतात ना ? सापाचा संचार असलेल्या झोपडीप्रमाणें या देहाविषयींहि जीवानें जागृत असावें. '

' सापाच्या सोबतीला उंदीरहि एकाच पाटींत कोंडून ठेवून दैव सावध राहायला सांगतें ! त्या सांगण्याचा उपयोग काय ? "

दत्त यावर कांहींच बोलला नाहीं. मालिनीनें-हि बोलणें तितक्यावरच थांबविलें. तिनें आपलें मन वैराग्याच्या वाटेकडे वळविलें.

७

" वर्ष कसेंबसें संपलें, वसंत फिरून आला. फिरून रानांत कोकिळेचें कूजन ऐकूं येऊं लागलें. सहकार मोहरला. मल्लिका बहरली. तरुणीच्या मनांत फिरून कामना अंकुरली. झाडाला जशी पालवी, वेलीला जसें फूल, मनालाहि कामना हा एक अनिवार्य सहज व्यापार. वठलेल्या वृक्षाला पालवी फुटणें हा त्याचा स्वभाव. वाढणाऱ्या वेलीला फुलें बहरणें हा तिचा स्वभाव. तरुण जीवनांत आकांक्षा किंवा कामना उद्भवणें हा त्याचा स्वभाव. सारी सृष्टि आशेचा उच्छवास घेवून उद्बुद्ध होत असतांना मालिनी मात्र त्याला अपवाद कसा राहील ? तिच्या हृदयांत प्रणय जागृत झाला.

" माणसें एकमेकांविषयीं विचारतात : ' हे अशी आशा कां करतात ? '. माणसें आशा करीत नाहींत. आशाच माणसांना करते, बनवते. नदीच्या पुरानें वाहून आणलेला केरकचरा, पालापाचोळा सैरावैरा आपण होऊन थोडाच जातो ? जीवनाच्या प्रवाहांत माणसांची स्थिति बहुशः अशीच—डोहांत सांपडलेल्या वस्तूंसारखे निःसत्त्व पदार्थ ! भारद्वाजा-पेक्षां सत्त्ववान् दुसरा कोण होता ? त्यालाहि प्रवाहानें गिळून टाकलें ! आशेच्या पूराचें पाणी चढूं लागल्यावर तो पूर त्याला गिळणार नाहीं असा जीव कुठें आहे ? जे हा आशेचा पूर आवरूं शकतात त्यांना हें पाणी चढत नाहीं. जे आवरूं शकत नाहींत त्यांनाच गांठून हा पूर ओढून, उचलून, वाहून नेतो. पूरांत सांपडलेला वृक्ष जर बळकट असला तर कसातरी पूर पार करून तो कुठचा तरी किनारा गांठतो. पण बळच नसलेली गवताची काडी डोहामध्येंच वाहत तरंगत जाते. या खेपेस आशेचा महापूर मालिनीला ओढून, पाडून, निर्दय-पणें तिला वाहून नेऊं लागला. कसेंहि करून दत्त आपलासा करून घ्यावाच, असा तिचा निर्धार झाला. एके दिवशीं त्याजकडे जाऊन ती बोलली : ' मी परत तुझ्याकडे भिक्षा मागायला आलें आहे ! ' दत्तानें परोपरीनें तिचें समाधान करून आपल्याला लग्न अशक्य आहे हें समजावून सांगितलें. मालिनीला आणखी बोलायचें होतें. पण तोंडीं आलेले बोल तिनें आवरून धरले. बिचारी आपल्या.







परीनें आल्या पावलीं परतून गेली. दुसऱ्या दिवशींच वसंत-पौर्णिमा होती. आश्रमांत त्या दिवशीं सण साजरा होतो. उशीरानें सर्व झोपी गेले. दत्त उठून एका एकान्त स्थळीं ध्यानस्थ बसला होता.

" मालिनी आपल्या कुटींत झोपली होती. तिला चांदण्याची म्हणजे प्राणापलीकडे आवड. चांदण्यांत हिंडावें म्हणून ती कुटीच्या बाहेर आली. आश्रमाच्या परिसरांत वेड्यासारखी भटकत, स्वतःलाच नकळत, दत्त ध्यानस्थ बसला होता त्या ठिकाणीं ती आली. दत्त ध्यान संपवून झोपला होता. नेसलेल्या वस्त्रावरच आपलें उत्तरीयहि त्यानें टाकलेलें होतें. त्याचें वरचें अंग चांदण्यांत उघडेंच पडलें होतें. त्याच्या चेहरा त्याच्या नेहमींच्या ऋजु, प्रशांत मंदस्मिताच्या छटेनें प्रसन्न दिसत होता. मालिनीला तो दत्त आहे याची जाणीव उरली नाहीं. भारद्वाजच आपल्यापुढें आहे, असा तिच्या मनाला भ्रम झाला. ती त्याच्या मस्तकाजवळ बसली. आपला उजवा हात त्याच्या कानशिलावर हलकेंच फिरवून तिनें त्याच्या गालाला स्पर्श केला व आपल्या त्या बोटांचें चुंबन घेतलें.

दत्त दचकून जागा झाला. त्यानें तरुणीला पाहिलें. एक क्षणाचाहि विलंब न करतां तो ताठ उठून तिच्यापुढें बसला. ' ताई, अशा वेळीं कां आलीस ? झोप आली नाहीं का ? ' त्यानें विचारलें.

" ' अशा वेळीं कां आलीस ? ' असें म्हणणारा ' अशी वेड्यासारखी काय चाळे करतेस ? ' असें ही विचारूं शकला असता. पण त्याचा स्वभाव फारच गंभीर व दाक्षिण्यपूर्ण. चूक करणाऱ्या माणसांना त्यांची चूक घडली आहे असे नुसते ध्वनित करणारे शब्दहि त्याच्या तोंडून निघत नसत ! इच्छेची गोष्ट राहो; त्याच्या अनैच्छिक क्रियाहि तशाच संयमशील बनल्या होत्या. चूक करून कुणी त्या चुकीबद्दल शरमिंधा झाला तर त्याच्या नजरेला ती चूक दिसत नसे.

" ' होय, मला झोप आली नाहीं. तुझ्याकडे यावें असें वाटलें. म्हणून उठून आलें ' मालिनी म्हणाली.

" ' बरं. चांदणं फार छान पडलंय्, होय ना, ताई ? मीहि कांहीं वेळ या चांदण्यांत नदीचें पाणी चमकतांना बघत बसलों होतों. रात्र फारच प्रशांत भासते, नाहीं ? '—तो म्हणाला.

" मालिनी कांहींच बोलली नाहीं. एक क्षण स्तब्ध राहून ती बोलली, ' तूं मला पुनः कांहीं तरी सांगावेंस. '

' कशाविषयीं ? '

' मीं तुला मागें विचारलें, त्याविषयीं. '

' मीं तेव्हांच सांगितलें ना ? '

' काय सांगितलेंस ? '

' मला लग्न नको आहे. '

' लग्न नको तर नको. आपण जोडप्यानें राहूं. '

" दत्त अशा बोलण्याला सिद्ध नव्हता. या शब्दांच्या आघातानें त्याची वृत्ति जणूं हादरली ! स्वतःस सांवरून घ्यायला त्याला एक क्षणाचा विलंब लागला असेल. क्षणानंतर तो बोलला : ' एवढेंच होय. मग त्याला काय हरकत ? आतां आहोंच कीं आपण जोडीनें. '

' माझें म्हणणें तुला समजलेंच नाहीं असा अभिनय करूं नकोस. तुला समजलें तर त्यांत मला कांहीं लाज वाटत नाहीं. तसा संकोच वाटत असला तर ही मी अशी आलें असतें का ? '

' लग्न देखील ज्याला निषिद्ध अशा ब्रह्मचाऱ्याला तूं दाखविलेली वाट योग्य मार्ग होईल का, ताई ? '

' आग लागो तुझ्या ताईला ! मी एक विचारतें तर तूं भलतेंच बोलतोस. मला जगणेंच कठीण झालें आहे. मला एकदां आपली करून घे. तुला एकदां माझा म्हणूं दे. एकदांच ! हेंहि होत नसल्यास मी नदींत बुडून प्राण देतें. '

' तें योग्य नव्हे, हें विधीनें गतवर्षीं दाखविलें नाहीं का ? '

' विधीनें कीं तूं दाखविलेंस ? मी पाण्यांत बुडून मरत होतें. तूं मला कां वांचविलेंस ? अशी विव्हळावी म्हणून ? त्या दिवशीं खरी मी वांचल्यें असतें. तूंच मला वांचवून ठार मारलेंस ! '

' ताई, मरणें तुझ्या हातीं नाहीं. जगविणें माझ्या शक्तीच्या पलीकडचें आहे. जीवनाचा योगक्षेम वाहणारी शक्ति वेगळीच आहे हें विसरूं नकोस










तूं अजाण नाहींस. तूं माझी वहिनी मला मार्ग दाखविणारी. तुझें वय कमी पण योग्यता कमी नाहीं. समजून घे. तूं वडील, या धाकट्याला वाट दाखव.'

"मालिनी कांहीं निमिष स्तब्ध राहिली. चटकन् दत्ताचें मुख आपल्या छातीशीं ओढून धरायला तिनें आपले हात पसरले.

"दत्त तितक्याच वेगानें मागें सरकला. जमिनीवर दंडवत् पडला. तिचे दोन्ही पाय आपल्या दोन्ही हातांनीं धरून : 'तूं माझें रक्षण कर. परीक्षा करूं नकोस. तूं स्त्री, आदिशक्ति. तुला पतनच नाहीं. मी स्त्री नव्हे. तुला असणारी आत्मशुद्धि मला नाहीं. तूं अनुग्रह केलास तरच मला पुढचा मार्ग दिसेल. तूं आग्रह धरलास तर मी मार्गभ्रष्ट व नष्ट होणार. माझ्यावर अनुग्रह कर. माझें रक्षण कर.' अशी काकुळतीनें दत्त विनवणी करूं लागला व ओक्साबोक्शीं रडूं लागला.

"मालिनीचें पुण्य बलवत्तर होतें. दत्ताच्या दीनवाणींतील एक काकुळतीची किंकाळी तिच्या जीवनाच्या कुठल्या तरी सूक्ष्म कळीवर आदळली व ती कळ जणूं फिरली. तिलाच नकळत कामनेनें जसें तिला तिथें आणलें, तसेंच तिलाच नकळत त्या करुण स्पंदनेनें तिच्या दृष्टीचें पटल जणूं दूर सारलें गेलें. आपली कामना पूर्ण करण्यास समर्थ असा वाटणारा तो दत्त काश्यप तिला त्या क्षणीं एखाद्या बालकासारखा, केवळ आपल्याच साहाय्यानें जगूं शकेल असा असहाय शिशूसारखा दिसला. वल्लभ म्हणून त्याला आलिंगिण्यासाठीं हपापलेले तिचे बाहू बाळाप्रमाणें त्याचें सांत्वन करण्यास पुढें सरसावले. तिनें त्याला जवळ ओढलें. बाळाप्रमाणें त्याच्या कुरळ्या केसांतून आपलीं बोटें फिरविलीं. त्याचे गाल व पाठ हलक्या हातांनीं कुरवाळले. डोकें वर उचलून धरून त्याच्या मुखाचा एक पापा घेतला अन् पुढच्या क्षणाला ती उठून उभी राहिली.

"दत्तहि जमिनीवरून उठून तिच्यासमोर उभा राहिला. 'तूं म्हणालास तेंच खरें. मी येतें!' एव्हढेंच मालिनी म्हणाली व प्रत्युत्तराची वाट न पाहतां संथपणें आपल्या कुटीकडे गेली.

८

"कुलपतींची कृपा व दत्त काश्यपाचा तपोमहिमा ह्या दोन्हींमुळें मालिनीचें कामनेच्या आवर्तापासून रक्षण झालें. दत्ताची तपश्चर्या अद्भुत रीतीनें वृद्धिंगत झाली. आपल्या पश्चात् तोच आश्रम चालविणार या गौरवाच्या दृष्टीनेंच कुलपति त्याच्याकडे पाहूं लागले. मालिनी त्याच्या आईसारखी, ताईसारखी त्याचा गौरव तो आपला मानून धन्य झाली. दत्तहि मोठा थोर झाला. मालिनीचा बचाव झाला. दत्ताच्या थोरपणामुळें मालिनीचा बचाव झाला. तो जर तसा थोर नसता तर तिची अवस्था काय झाली असती? दत्ताच्या वृत्तीमुळें दोघांचाहि धर्म दृढ राहिला. दोघांचेंहि निरयापासून रक्षण झालें. याविषयीं विचार करतांना अनेकदां मला दत्तासारखा धृतिमान् पुरुष जगांत अपूर्व होय असें वाटलें आहे. दत्त जर दत्त नसता तर त्या रात्रीं ती मुलगी पतिता झाली असती!

"दत्ताच्या तपस्येप्रमाणेंच मालिनीची पुण्याई मोठी. तेवढें पुण्यबल नसलेली मुलगी जर तशा कामनेच्या आवर्तांत सांपडती तर तिचें काय झालें असतें? त्यासाठींच मी म्हणत असतें, मुलींना फार वय होण्याच्या अगोदरच त्यांचीं लग्नें उरकून घ्यावीं. सर्वच मालिनी नसतात. सर्वांनाच तिच्यांत उद्भवली तशी लग्नाची आकांक्षा उद्भवत नाहीं. उद्भवली तर ती टळत नाहीं. लहानपणापासून तपस्याच आवडून चालणाऱ्यांची गोष्ट वेगळी. लग्न झालें तर बरें असें वाटणाऱ्या मुलीला योग्य वयांतच सहचर मिळावा. तसा न मिळाल्यामुळेंच ही शकुंतला—बाळ, माझ्या बोलण्यानें वाईट वाटून घेऊं नकोस—राजाला पाहिल्याबरोबर त्याच्यावर भाळली. तुम्ही दोघीजणी देखील तिच्या इच्छेप्रमाणें चालायला कबूल झालांत. ज्या मीं तुमचें जन्मभर पालनपोषण केलें त्या मला तुम्हीं परक्यांप्रमाणें मानलेंत व आगंतुकाला आपला मानलेंत! त्यासाठींच मुलींनो, त्या वेळीं तुम्हां दोघींचे विवाह झाल्याखेरीज मला निश्चिंती नाहीं, असें मी म्हणालें."

९

तापसीनें गोष्ट संपविली. मैत्रिणी एक क्षण कांहींच










अनुक्रमणिका

बोलल्या नाहींत. नंतर प्रियंवदा म्हणाली, " आजी, तूं सांगितलेली हकीगत वृत्तान्तासारखी नाहीं, गोष्टीसारखी वाटते. वृत्तान्त असता तर या घटनांची इतकी तपशीलवार माहिती तुला कळली असती कशी ? " .

अनसूया हंसली व शकुंतलेकडे बघून म्हणाली, " ही गोष्ट नव्हे, वृत्तान्तच होय. आजीला त्याची बारीक हकीगत माहीत आहे. नाहीं का ग, शकू ? "

शकुंतलेनें ' होय ' म्हणून मान हालविली. प्रियंवदा बोलली, " तें कसें ? ही गोष्ट तुम्हां दोघींनाच कळावी अन् मला समजूं नये, हें कसें ? "

अनसूया म्हणाली : " आजीबाईंनीं सम्मति दिली तर तें कसें काय हें मी सांगतें. "

" हात्तिच्या, एवढेंच ना ? सांग बाई. त्यांत संकोच कसला ? " गौतमीनें उत्तर दिलें.

" मालिनी दुसरी कोणीच नव्हे. मालिनी म्हणजे आपल्या आजीबाई गौतमीच ! " अनसूयेनें सांगितलें.

" होय, बाळ. " गौतमीनें दुजोरा दिला.

प्रियंवदा उद्गारली : " आजी तूं किती ग कष्ट सोसलेस ! माझ्या अंगाला कंप सुटतोय् तुझे हाल आठवून. तर मग दत्त कुठें गेला ? आजी, त्याचें काय झालें ? किती मोठा महात्मा तो ! "

अनसूया बोलली : " तेंहि मीच सांगेन. पण त्यालाहि आजीची अनुमति हवी. "

" होय बाळ, तुला कळलें आहे. सांग. प्रियंवदेला समजूं दे." गौतमीनें अनुमति दिली.

" आपले कुलपति कण्वच दत्त. " अनसूया म्हणाली.

प्रियंवदा उद्गारली : " अग बाई, खरेंच कीं ! एक क्षण तुम्ही गप्प राहिलां असतां, तर मींच सांगितलें असतें. आजी मधेंच बाहेर जाऊन आली ना ? तेव्हां ती नुकतीच डोळे पुसून घेऊन आल्यासारखी दिसली. पण बालपणांतील एका मैत्रिणीची कथा आठवल्यामुळें तिच्या डोळ्यांना पाणी आलें असावें, असेंच मीं मानलें. स्वतःची कथाच नव्हे अशा तऱ्हेनें आजी सांगत असल्यामुळें, परक्यांचीच ही गोष्ट असें मानून मी चाललें. म्हणून माझी जरा दिशाभूल झाली ! "

शकुंतला म्हणाली, " तरुणपणचे दत्तच आमचे पिताजी कण्व ! नाहीं तर आमचे पिताजी आतां असे असते का ? वाहून नेणाऱ्या महापूरासारख्या मोहाला नेटानें व धीरानें पोहून पार करणारे आपले कुलपतिच ! भारद्वाज श्रेष्ठ युवक खरा. पण दत्ताच्या तोडीचा नव्हता खास. कोटींत एखादाच आमच्या पिताजींसारखा निघेल ! "

अनसूया म्हणाली, " कुलपति आजीबाईंकडे एवढ्या आदरानें कां पाहतात याचा उलगडा मला आत्तां झाला. आजी वयानें त्यांच्यापेक्षां लहान, तरी पण ते तिला वडीलकीचा मान देतात. "

गौतमी म्हणाली " होय बाळ. त्यांनीं अनेक वेळां म्हटलें होतें : ' ओसरलेली नदी पोहून पार जाणें सुलभ. भरलेल्या नदीच्या पूरांत पोहून पलीकडे पोहोंचणें परम कठीण. आर्या गौतमी भरलेली नदी पार करून सुरक्षित किनारा गांठलेली माऊली ! ' त्यांना कामना, मोह नव्हते, नाहींत, असें नव्हे. पण माझ्या जीवनांत आला तसा पिसाट पूर त्यांच्या जीवनांत लोटला नव्हता अशी त्यांची धारणा. परंतु अबलेला मोहकामनांमुळें जेवढे कष्ट घडतात तेवढे बलवानाला घडत नाहींत ! कुलपति महाप्रभावशाली. त्यामुळेंच ह्या आश्रमाचा एवढा महिमा झाला आहे. आम्हांला चक्रवर्ती जामात लाभला. आमचा नातूहि चक्रवर्ती होणार."

शकुंतला म्हणाली, " बाबांचा महिमाच यामुळें व्यक्त होतो हें खरेंच. पण तितकीच महत्त्वाची दुसरीहि गोष्ट आहे. ती म्हणजे आजी, तुझें मृदु हृदय. तूं आपल्या जीवनांत अशी एक अगाध व्यथा पाहिल्यामुळेंच तूं आमच्या वेदनेनें गहिवरतेस, आश्रमहरिणींना बाळांप्रमाणें सांभाळतेस, चक्रवाकींना सखी म्हणून संबोधितेस. तुझें हृदय किती किती मृदु आहे,आजी ! "

गौतमी उठली. " उशीर झाला बाई, आतां तरी झोपायला जा " असें म्हणून तिनें शकुंतलेचें मस्तक कुरवाळून, अनसूया–प्रियंवदांच्या केसांवरून हात फिरवून त्यांच्या कपोलांना मृदु स्पर्श केला; अन् " चला आतां. आणखी उशीर करूं नका निजायला. चला ! " असें ममतेनें बजावून ती वृद्ध तापसी आपल्या एकान्त कुटीराकडे गेली.

श्री. कृ. ना. फडके

# कॉ. जोसेफ स्टॅलिन

सर्वातिरिक्तसारेण सर्वतेजोऽभिभाविना । स्थितः सर्वोन्नतेनोर्वीं क्रान्त्वा मेरुरिवात्मना ॥ -कालिदास.

ता. ५ मार्च १९५३ रोजीं रात्रीं १० वाजण्याच्या सुमारास कॉम्रेड जोसेफ स्टालिन हे कालवश झाले ! कॉम्रेड स्टालिनच्या निधनामुळें, ज्या लोकोत्तर व धीरोदात्त व्यक्तिमत्त्वाचें वर्णन कालिदासानें वरील श्लोकांत केलेलें आहे, असें व्यक्तिमत्त्व लाभलेल्या एका प्रज्ञावान्, पराक्रमी, कार्यकुशल व प्रतिभासंपन्न नेत्याला, सोव्हिएत यूनियनमधीलच नव्हे तर साऱ्या जगांतील जनतेला मुकावें लागलें आहे. स्टालिनच्या नेतृत्वाखालीं सोव्हिएत जनतेनें केलेल्या प्रगतीला जगाच्या इतिहासांत तोड नाहीं ! परंतु सोव्हिएत जनतेनें मिळविलेलें यश हें साऱ्या जगामधील जनतेचें धन होय. कॉम्रेड स्टालिन ह्याच्या शब्दांत सांगावयाचें तर तें यश म्हणजे—" साऱ्या मानवजातीनें मुक्ततेसाठीं चालविलेल्या संग्रामांतील लढ्यांचें व विजयांचें सार होय." सोव्हिएत संस्कृतीचा आज जो विकास झालेला दिसत आहे तो विकासच " भांडवलशाही देशांतील जनतेचा कार्यक्रम ठरणार आहे; तो कार्यक्रम जनता पार पाडूं शकेल, प्रत्यक्षांत आणूं शकेल ह्याची ती एक प्रचीति आहे." हें सोव्हिएत संस्कृतीच्या यशाचें स्टालिननें केलेलें मोजमाप किती अचूक होतें ह्याची ग्वाही पूर्वयुरोप व चीन येथील नवलोकशाही राष्ट्रांमधील जनता आज जगाला देत आहे. स्टालिनच्या जीवन-कार्याची महती नीतिशास्त्रविशारदांच्या भावरूप नीतिमूल्यांच्या तराजूंत कितीहि भरो; ती महती, भांडवलशाहीच्या पाशांतून मुक्त होण्यासाठीं झगडत असलेली अथवा मुक्ततेच्या मार्गावर असलेली जनता स्टालिननें चोखाळलेला मार्ग किती प्रमाणांत अंगीकारिते, ह्यावरून भविष्यकाल ठरविणार आहे.

ह्या लेखांत स्टालिनचा जीवनवृत्तान्त देण्याचा मानस नाहीं. तसेंच, स्टालिननें गेल्या ५०-६० वर्षांच्या काळांत केलेल्या साऱ्या कार्यांचा आढावा देणेंहि शक्य नाहीं. स्टालिनचें वैयक्तिक जीवन समाजाशीं इतकें समरस झालेलें होतें कीं, त्यानें केलेल्या कार्यांचा आढावा घेणें म्हणजे गेल्या ५०-६० वर्षांमधील जागतिक समाजवादाच्या लढ्यांचा इतिहास लिहिणेंच होय. ह्या लेखाच्या मर्यादेमध्यें स्टालिनच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविधांगांचें दर्शन ज्यांच्यामध्यें होईल अशा कांहीं थोड्या ठळक घटनांचाच व कार्यांचाच आढावा घेणें शक्य आहे.

लेनिनप्रमाणेंच स्टालिनच्या क्रांतिकारक जीवनाचा प्रारंभ त्याच्या विद्यार्थिदशेपासूनच झाला. त्याचा जन्म ट्रॅन्सकॉकेशियामधील तिफ्लिस जिल्ह्यांतील गोरी नांवाच्या खेड्यांत ता. २१ डिसेंबर १८७९ रोजीं झाला. वयाच्या तेराव्या वर्षीं गोरी येथील धार्मिक पाठशाळेंतील चार वर्षांचा अभ्यासक्रम संपवून त्यानें तिफ्लिस येथील धार्मिक महाविद्यालयांत प्रवेश केला. तेथें असतांना त्याचें लक्ष डार्विन, मार्क्स इत्यादि पाखंडी विचारांच्या लेखकांकडे आकर्षिलें गेलें. त्या वेळीं रशियामधील तरुण पिढीमध्यें असलेल्या पाखंडी विचारांचा प्रसार फार झपाट्यानें होत होता. त्या कारणानें धार्मिक पाठशाळेमधील विद्यार्थ्यांवर करडी नजर ठेवण्यांत येई. ह्या हेरगिरीच्या त्या अपमानास्पद जाचाचा ठराविक परिणाम स्टालिनवरहि झाला. त्याच्या अंगीं बंडखोरीची प्रवृत्ति बळावली व अखेर त्यानें क्रांतिकारक जीवनाचा मार्ग पत्करला.

१८९४ ते १८९९ हीं पांच वर्षें स्टालिननें मार्क्सवादाचा इतिहास व तत्त्वज्ञान ह्यांच्या व्यासंगांत घालविलीं. १८९८ सालीं त्यानें तिफ्लिसमधील सोशल डेमोक्रॅटिक विचारांच्या एका संघटनेंत प्रवेश केला. ह्या संघटनेंत कार्य करीत असतां स्टालिननें तेथील कामगारवर्गांत व विद्यार्थिवर्गांत अनेक अभ्यासमंडळें संघटित केलीं. रशियामधील समाजवादी व मार्क्सवादी








म्हणविणाऱ्या सुशिक्षित वर्गांतील तरुणांमध्यें व पुढारलेल्या कामगारांमध्यें जें वैचारिक वारें वाहत होतें त्याचे पडसाद तिफ्लिसमधील सोशल डेमोक्रॅट मंडळींच्या गटांत त्या वेळीं उमटूं लागले होते. तेथेंहि त्याच स्वरूपाचे वैचारिक झगडे निर्माण झाले होते. ह्या कारणानेंच लेनिनच्या लेखांशीं व विचारांशीं स्टालिनचा लौकरच परिचय झाला. लेनिनच्या लेखांचा स्टालिनच्या मनावर फार खोल परिणाम झाला व १८९८ पासून पुढील ५-७ वर्षांच्या काळांत लेनिनच्या शिकवणुकीनुसार स्टालिननें कामगारवर्गांत कार्य करावयास धडाडीनें सुरुवात केली. 'समाजवाद व कामगार-चळवळ ह्यांची सांगड घालून, कामगार-संघटनेच्या द्वारा कामगारवर्गाला लोकशाही लढ्याच्या रणभूमीवर उतरविणें व भांडवलशाही पिळवणुकींतून स्वतःची व साऱ्या पिळल्या जाणाऱ्या जनतेची मुक्तता करणें हें कामगारवर्गाचें ऐतिहासिक कार्य होय, तें कार्य करण्यास कामगारवर्गच समर्थ ठरणार आहे व इतिहासक्रमानें तें कार्य त्याच्या आवाक्यांत आलेलें आहे ही जागृति त्यांच्या ठिकाणीं निर्माण करणें, हें समाजवादी पक्षाचें कार्य होय' ही लेनिनची शिकवण त्यानें ट्रॅन्सकाकेशियामधील कामगारांपर्यंत पोहोंचविली. ह्या शिकवणुकीचें विवरण व समर्थन करणारे अनेक लेख त्यानें ह्या काळांत लिहिले व त्यासाठीं अनेक पत्रांच्या संपादनाचें व प्रकाशनाचें कार्यहि त्यानें ह्या काळांत केलें. १९०१ सालीं टिफ्लिस शहराच्या मध्यभागीं कामगारांनीं केलेलें 'मे' दिनाचें निदर्शन, १९०२ च्या मार्च महिन्यांत बातुमच्या कामगारांनीं केलेलें राजकीय निदर्शन, १९०४ च्या डिसेंबरच्या महिन्यांत स्टालिन व दुजापारिद्झे ह्यांच्या नेतृत्वाखालीं १८ दिवसपर्यंत बाकूच्या कामगारांनीं लढविलेला प्रचंड संप—ह्या घटना स्टालिननें अवघ्या पांच वर्षांत ट्रान्सकाकेशियामध्यें केलेल्या संघटनात्मक व राजकीय कार्याचीं दृश्यफलें होतीं. १९०३ सालीं कॉकेशस सोशल डेमोक्रॅटिक पक्षाची पहिली कॉंग्रेस भरली. स्टालिनची व लेनिनची प्रत्यक्ष भेट १९०५ सालापर्यंत होऊं शकली नाहीं. परंतु 'इस्का' पत्राच्या द्वारा लेनिननें सुरू केलेला वैचारिक व संघटनात्मक क्षेत्रामधील लढा स्टालिननें तितक्याच नेटानें व प्रभावीपणानें ट्रॅन्सकाकेशियाच्या विभागांत चालू ठेविला व त्यांत थोडक्या अवधींत स्पृहणीय यश संपादन केलें. ह्या काळांत स्टालिननें लिहिलेले 'सोशल डेमोक्रॅटिक पक्ष व त्याचीं तातडतोबीचीं कार्यें', 'पक्षामधील मतभेदांचें त्रोटक विवेचन', 'सोशल डेमोक्रॅट्सना उत्तर', 'कामगारवर्ग व कामगार-पक्ष' इत्यादि लेख लेनिनवादाच्या मूलतत्त्वांच्या सरळ, सोप्या पण हिशेबी व सडेतोड विवेचनाचे उत्कृष्ट नमुने होत. इतकेंच नव्हे तर, लेनिनवादाच्या मूलतत्त्वांचा बोध नवशिक्यांना करून देण्याच्या कामीं स्टालिनचे वरील लेख लेनिनच्या विवादात्मक लेखांहून अधिक उपयुक्त ठरतात असें अनुभवास येतें. वरील लेखांपैकीं कांहीं लेखांचा उल्लेख करून लेनिननें स्टालिनच्या लेखन-कौशल्याची मुक्तकंठानें प्रशंसा केली होती. १८९८ ते १९०५ ह्या काळांत स्टालिनला अनेक वेळां अटक, हद्दपार, पलायन, पुनश्च अटक ह्या चक्रांतून जावें लागलें, हें सांगावयास नकोच.

१९०५ च्या क्रांतीच्या पाडावानंतर बोल्शेव्हिक पक्षानें फक्त एक सनदशीर पक्ष म्हणून काम करावें, पक्षाची भूमिगत संघटना अनावश्यक म्हणून विसर्जन करावी इत्यादि विचारप्रवाह डोकें वर काढूं लागले होते. दुसऱ्या बाजूला झारनें भरविलेल्या 'ड्यूमा'वर बहिष्कार घालण्याची जहाल विचारसरणीहि पुढें सरसावत होती. ह्या दोन्ही प्रवृत्तींविरुद्ध लेनिननें केलेल्या लढ्यांत स्टालिननें उत्कृष्ट साहाय्य केलें. तिसऱ्या व चौथ्या ड्यूमामधील सोशल डेमोक्रॅटिक आमदारांना 'मतदारांचें आज्ञापत्र' म्हणून दोन आज्ञापत्रें स्टालिननें लिहून, त्यांस कामगारांच्या प्रतिनिधींची मान्यता मिळवून, तीं प्रसिद्ध केलीं. हीं आज्ञापत्रें कायदेमंडळाचा उपयोग बोल्शेव्हिकांनीं कां, केव्हां व कसा करून घ्यावा, त्यासाठीं कोणते डावपेच योजावेत ह्यांची उत्कृष्ट कल्पना आणून देतात. त्या आज्ञापत्रांची उपयुक्तता अजून देखील संपुष्टांत आली असें म्हणतां यावयाचें नाहीं.

१९१३ सालीं स्टालिननें 'मार्क्सवाद व राष्ट्रीय-








त्वाची समस्या ' हा प्रबंध प्रसिद्ध केला. स्टालिनच्या ह्या प्रबंधास लेनिनच्या ' साम्राज्यशाही ' अथवा ' राज्यसंस्था व क्रांति ' ह्या प्रबंधांप्रमाणें त्यांच्याइतकेंच मानाचें स्थान मार्क्सवादी वाङ्मयांत देण्यांत येतें. क्रांतिपूर्व व क्रांत्युत्तर काळांत कामगारवर्गाची एकसंध वर्गीय एकजूट बांधण्यांत व अनेक राष्ट्रांचें एकसंध संघराज्य बांधण्यांत बोल्शेव्हिक पक्षानें जें यश मिळविलें आहे त्याचें श्रेय स्टालिननें ह्या प्रबंधाच्या द्वारें केलेल्या मार्गदर्शनास दिलें पाहिजे. आन्तरराष्ट्रीयवाद म्हणजे राष्ट्रवादाचें अथवा राष्ट्रीयत्वाचें विसर्जन नव्हे, तर राष्ट्रीयत्वाच्या निकोप विकासाचा मार्ग मोकळा करण्याचें वैचारिक हत्यार होय, हा मुद्दा ह्या प्रबंधांत विस्तारानें विवेचिलेला आहे. आज आपणांपुढें भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न, काश्मीरच्या सवत्या सुभ्यामुळें उत्पन्न झालेलें वादळ, राज्यभाषा व प्रांतभाषा ह्यांच्या परस्परसंबंधाचा प्रश्न, इत्यादि प्रश्न निकडीनें उभे आहेत. ते सोडविण्याच्या कामीं स्टालिनचा वरील ग्रन्थ, त्यांत दिलेले इशारे ध्यानीं घेतल्यास, निःसंशय उपयुक्त ठरेल.

स्टालिननें भाषाविचारासंबंधीं एक प्रबंध व ' सोव्हिएत यूनियनमधील समाजवादविषयक आर्थिक प्रश्न ' असे दोन बहुमोल प्रबंध गेल्या दोन वर्षांत प्रसिद्ध केलेले आहेत. वरील दोन्ही प्रबंधांप्रमाणेंच चाळीस वर्षांपूर्वी स्टालिननें लिहिलेला राष्ट्रवादावरील प्रबंध तसेंच, ' अराजकवाद व समाजवाद ' हा प्रबंध त्याच्या लेखनशैलीच्या वैशिष्ट्याची कल्पना पूर्णपणें आणून देतात. ' जो विचार त्या विषयाशीं संबद्ध अशा सर्वसाधारण जनसमुदायाला समजेल अशा भाषेंत आपणाला सांगतां येत नाहीं तो आपणांस समजलेला नाहीं ', हें स्टालिनच्या लेखनव्यवसायाचें ब्रीदवाक्य होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं. सकृद्दर्शनीं स्टालिननें विवेचिलेले विचार अगदीं प्राथमिक स्वरूपाचे वाटतात. परंतु त्यांचें पुनः पुनः वाचन व मनन केल्यानें स्टालिनच्या विवेचनांतील अभिप्रेत हेतु अधिकाधिक स्पष्ट होऊन, मूळच्या विवेचनामधील अर्थगौरवाची यथार्थ कल्पना येऊं लागते. स्टालिनच्या भाषाशैलीचें व विवेचनशैलीचें तें एक असाधारण वैशिष्ट्य होय, असें म्हणावयास हरकत नाहीं.

क्रांतिकारक व लढाऊ चळवळीचा संघटक व पक्षसंघटक ह्या दोन्हीं नात्यांनीं करावयाच्या कार्यांतील स्टालिनचें कौशल्य १९०५ च्या क्रांतीपूर्वींच कसास लागलें होतें. परंतु फेब्रुवारी १९१७ च्या क्रांतीपासून नोव्हेंबरच्या क्रांतीपर्यंतच्या काळांत पक्षसंघटक व लढाऊ उठावाचा नेता ह्या दोन्ही दृष्टींनीं स्टालिननें जी कामगिरी बजाविली ती फारच उच्च दर्जाची होती. १९१७ च्या जुलै व ऑगस्ट महिन्यांत बोल्शेव्हिक पक्षाच्या सहाव्या कॉंग्रेसपुढें त्या वेळच्या राजकीय परिस्थितीबाबत स्टालिननें सादर केलेला विस्तृत अहवाल व त्या अहवालाच्या आधारावर, ' पाश्चिमेकडील भांडवलशाही देशांत क्रांति होत नाहीं तोंपर्यंत रशियांत कामगारवर्गाच्या हातीं सत्ता टिकणें अथवा तेथें समाजवादी समाजपद्धतीची उभारणी करणें शक्य नाहीं ' ह्या कॅमेनेव्ह, ट्रॉट्स्की वगैरेंच्या विरोधी मतांवर मात करून, ऑक्टोबरक्रांतीच्या तयारीचा मार्ग स्टालिननें खुला केला. लेनिनच्या अज्ञातवासांत, रशियामधील कामगारवर्गावरील अविश्वास तसेंच पाश्चिमात्य भांडवलशाही राष्ट्रांमधील अन्तर्विरोध व त्यांच्यापुढील निकडीच्या समस्या ह्यांचें अज्ञान—या गोष्टींवर आधारलेल्या ट्रॉट्स्की, झिनोव्हीव इत्यादि अतिजहालवाद्यांच्या व त्याच अधिष्ठानावर आधारलेल्या कॅमेनेव्ह, रिकोव्ह, टॉम्स्की इत्यादि शरणागतपंथीयांच्या विरोधाचा मुकाबला करण्याची जबाबदारी स्टालिननें उत्कृष्टपणें पार पाडली. सशस्त्र उठावाच्या मार्गदर्शनासाठीं नेमलेल्या केंद्राचा प्रमुख म्हणून स्टालिननें बजाविलेली कामगिरी त्याच्या लष्करी कर्तृत्वाची साक्ष देणारी होती.

परंतु लष्करी नेता अथवा सेनानी ह्या नात्यानें स्टालिनचें कर्तृत्व १९१८ ते १९२० च्या यादवी युद्धाच्या कालांत पणाला लागलें. " ह्या काळांत ज्या ज्या ठिकाणीं क्रांतीच्या अस्तित्वाला सर्वांत भीषण धोका उत्पन्न झाला असेल त्या त्या








ठिकाणीं पाठविण्यास लायक असा एकच नेता पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या हाताशीं होता व अशा प्रत्येक ठिकाणीं कमिटीनें त्याचीच योजना केली " असा अभिप्राय स्टालिनला अनुलक्षून कालिनिननें नमूद केलेला आहे. ह्या काळांत झारित्सिन व पर्म ह्या शहरांच्या बचावाचा संग्राम, पेट्रोग्राडच्या दाराशीं ठाकलेल्या युडेनिचच्या फौजांचा व दक्षिणेकडील डेनिकिन व रँगेल ह्यांच्या फौजांचा पाडाव, झिटोमिटच्या वेढ्याचा पाडाव इत्यादि अत्यंत आणीबाणीच्या लष्करी जबाबदाऱ्या स्टालिनवर सोंपविण्यांत आलेल्या होत्या व त्या सर्व त्यानें यशस्वीपणें पार पाडल्या.

स्टालिनच्या यशाचें मर्म हें केवळ लष्करी डावपेंचांमधील पारंगततेमध्यें नसून तें मुख्यतः त्याच्या दुर्दम्य निर्धारांत व त्याच्या धीरोदात्त प्रकृतींत असावें, असें म्हटलें तर तें अधिक यथार्थ ठरेल. आपल्या ठिकाणचा हा निर्धार आपल्या सहकाऱ्यांच्या ठिकाणीं अल्पावधींत खेळविण्याचें अलौकिक सामर्थ्य स्टालिनच्या ठिकाणीं होतें. स्टालिनच्या सान्निध्यांत असतांना किंवा त्याच्या नेतृत्वाखालीं काम करतांना परिस्थिति कितीहि निराशाजनक का असेना, आपल्या यशाबद्दल साशंकता अशी त्याच्या कोणाहि सहकाऱ्याला वाटली नाहीं. १९४२ सालामधील प्रतिकूल परिस्थितींत आणि स्टालिनग्राडच्या वेढ्याच्या भीषण संग्रामांत स्टालिनच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव जगाच्या प्रत्ययास आला.

परंतु स्टालिनच्या लष्करी नेतृत्वाचा उत्कृष्ट गुणादर्श म्हणजे स्टालिनची लाल सेना. स्टालिनग्राडच्या वेढ्याच्या वेळीं लाल सेनेच्या जागीं जगांतील साऱ्या साम्राज्यशाही राष्ट्रांच्या फौजा आणि लष्करी सामग्री स्टालिनच्या दिमतीस असती तरी स्टालिनला यशाची ग्वाही देतां आली नसती. अखेर मानव हा साऱ्या यंत्रापेक्षां श्रेष्ठ होय, ह्या श्रद्धेवर लाल सेनेची, नव्हे, साऱ्या सोव्हिएत संस्कृतीचीच उभारणी झालेली आहे. आणि ह्या श्रद्धेमुळेंच युद्धखोरांच्या अणुशक्तीच्या वापराच्या प्रतिदिनीं उठणाऱ्या साऱ्या गर्जना स्टालिनच्या स्मितापुढें फिक्या पडत ! मानवाच्या उज्ज्वल भवितव्यावरील अढळ श्रद्धा ही अणुशक्तीपेक्षां कित्येक पटींनीं श्रेष्ठ अशी शक्ति स्टालिनच्या पाठीशीं उभी असे. ह्या श्रद्धेच्या सामर्थ्यावरच स्टालिननें गेलें महायुद्ध जिंकलें. आणि युद्धोत्तर कालांत त्या सामर्थ्यावरच युद्धानं जर्जर झालेल्या सोव्हिएत भूमीला अवघ्या सात वर्षांच्या अवधींत जगाच्या दृष्टीनें शांततेचें आशास्थान बनविण्यांत स्टालिनला यश आलें.

जागतिक शांततेसाठीं स्टालिनच्या नेतृत्वाखालीं सोव्हिएत युनियननें अव्याहत प्रयत्न केले. पहिली पंचवार्षिक योजना पुरी झाल्यानंतर त्याच्या नेतृत्वाखालीं सोव्हिएत यूनियननें बचावाचा पवित्रा बदलून, साम्राज्यशाही राष्ट्रांच्या आक्रमणाला पायबंद घालण्यासाठीं व जागतिक शांतता टिकविण्यासाठीं पुढाकार घेण्याचें धोरण अवलंबिलें व राष्ट्रसंघांत प्रवेश केला. ज्या राष्ट्रसंघास रशियानें साम्राज्यवाद्यांच्या हातांतील हत्यार म्हणून हिणविलें त्या राष्ट्रसंघांत प्रवेश केल्याबद्दल स्टालिनच्या धोरणावर संधिसाधूपणाचा आरोप करण्यांत येतो. परंतु हे टीकाकार " जगांत जें नवीन निर्माण होत असतें, जें जें विकास पावत असतें, त्यावर लक्ष केन्द्रित करा म्हणजेच प्रगतीचा मार्ग चोखाळतां येईल " हा स्टालिनचा सिद्धान्त डोळ्याआड करीत असतात. तसेंच, परिस्थितीचें शास्त्रीय दृष्ट्या मोजमाप करीत असतांना वस्तूला स्वयंगति असते आणि ती हिशेबांत घ्यावी लागते हा स्टालिनचा दुसरा सिद्धान्तहि ते डोळयाआड करीत असतात. जोंपर्यंत सोव्हिएत राज्यसंघाला बळकटी आलेले नव्हती, जोंपर्यंत त्याचें अस्तित्व पदोपदीं धोक्यांत येण्याचा संभव होता, तोंपर्यंत सोव्हिएतच्या नेतृत्वाला व कर्तृत्वाला जागतिक राजकारणांत वाव नव्हता, हें स्टालिन ओळखत होता. परंतु १९३४ नंतर ही परिस्थिति पालटली आणि ज्या क्षणापासून सोव्हिएत यूनियनला जगाच्या राजकारणांत महान् राष्ट्राचा दर्जा प्राप्त झाला त्या क्षणापासून स्टालिननें साम्राज्यवाद्यांच्या आक्रमणाला पायबन्द घालण्यासाठीं व युद्धाचा धोका टाळण्यासाठीं आपल्या राष्ट्राचें वजन व कर्तृत्व उपयोगांत आणल्याचें










दिसून येईल. दुसऱ्या महायुद्धानन्तरच्या कालांत देखील स्टालिननें तेंच धोरण सुसंगतपणें चालूं ठेविलें होतें. १९३४ सालानंतर सोव्हिएत यूनियननें आपल्या सरहद्दीवरील बहुतेक सर्व राष्ट्रांबरोबर अनाक्रमणाचे तहनामे केले. तसेंच, स्वसंरक्षणासाठीं आवश्यक तेवढी दक्षता ठेवून, फ्रान्स, झेकोस्लोव्हेकिया इत्यादि राष्ट्रांबरोबर आक्रमणविरोधी परस्परमदतीचे करार केले. शस्त्रास्त्रवाढीला पायबंद घालण्याचे, आक्रमक राष्ट्राची स्पष्ट व्याख्या करण्याचे प्रयत्न सोव्हिएतनें अनेकवार केले; परंतु फॅसिस्ट राष्ट्रांच्या शस्त्रास्त्रवाढीला हातभार लावून स्वतःचे खिसे भरूं पाहणाऱ्या व मँचूरिया, ॲबिसीनिया, स्पेन इत्यादि राष्ट्रांवरील लष्करी आक्रमणाला प्रोत्साहन देणाऱ्या भांडवलशाही राष्ट्रांच्या धोरणामुळें ते सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. "फॅसिस्ट सत्तांना पोसून सोव्हिएत यूनियनचें परस्पर निर्दालन करण्यासाठीं भांवडलशाही राष्ट्रें जें राजकारण खेळत होतीं तें राजकारण, सोव्हिएतद्वेषाची वावटळ उठवून छपवितां येईल व यशस्वी करतां येईल ही आशा फोल आहे. हा भस्मासुर तुमच्यावर उलटेल." असा स्पष्ट इशारा कम्युनिस्ट पक्षाच्या १८ व्या काँग्रेसपुढें सादर केलेल्या राजकीय अहवालांत स्टॅलिननें दिलेला होता. फॅसिस्टवादाला विरोधी असलेल्या राष्ट्रांनीं आपलें सामर्थ्य एकवटल्यास तीं फॅसिस्ट आक्रमणावर यशस्वीपणें मात करूं शकतील असा विश्वासहि स्टालिननें त्या अहवालांत व्यक्त केलेला होता. परंतु शांततेच्या संरक्षणासाठीं केलेले सारे प्रयत्न वायां गेल्यानें सोव्हिएत यूनियननें स्वसंरक्षणासाठीं जर्मनीबरोबर अनाक्रमणाचा करार केला व साम्राज्यवाद्यांच्या सोव्हिएत—द्वेष्ट्या राजकारणाला शहाला काटशह दिला. ह्या अनाक्रमणाच्या कराराचा आधार घेऊन स्टालिनविरुद्ध टीकेची वावटळ उठविण्यांत आली, संधिसाधूपणाचे व तत्त्वभ्रष्टतेचे आरोप करण्यांत आले व अजूनहि ते करण्यांत येत असतात. परंतु ह्याचें कारण ह्या टीकाकारांपैकीं जे भाबडे असतात त्यांना संधिसाधूपणा व समयज्ञता, तत्त्वनिष्ठा व तत्त्वलोलुपतेचा सोंगाडेपणा ह्यांच्यामधील भेद कळत नसतो.

फॅसिस्ट जर्मनीनें सोव्हिएत यूनियनवर हल्ला केला तेव्हां सोव्हिएत जनतेला उद्देशून स्टालिननें केलेल्या भाषणांत, १९३९ ते १९४१ ह्या कालावधींत भांडवलशाही राष्ट्रांमधील जनतेला आलेला अनुभव लक्षांत घेऊन, "आपल्या देशाच्या स्वातंत्र्याचें हें युद्ध अमेरिका व युरोप येथील जनतेच्या स्वातंत्र्य-युद्धाशीं व लोकशाही हक्कसंरक्षणाच्या युद्धाशीं लवकरच एकरूप होईल" असे उद्गार काढले होते. स्टालिनची ती भविष्यवाणी खरी ठरली; इतकेंच नव्हे तर, त्या महान् संग्रामांत विजयाची आशा व मार्ग जगाला दाखविण्याचा मान कॉम्रेड स्टालिनला मिळाला. आज आंतरराष्ट्रीय राजकारणाचें अन्तराळ सोव्हिएतद्वेषाच्या धुरळ्यानें कितीहि धूसर झालें असलें तरी दुसऱ्या महान् युद्धांत कॉ. स्टालिनच्या नेतृत्वाखालीं सोव्हिएत जनतेनें केलेल्या महान् कार्याचा विसर जगांतील जनतेला पडणें शक्य नाहीं.

जगांतील मानवविद्वेषी व रानटी शक्तींचा पाडाव केल्यानंतर स्टालिननें जगाला पुनश्च शांतता-संरक्षणाचा आदेश दिलेला आहे. स्टालिनप्रणीत शांतताचळवळ ही केवळ काळकाढूपणाची हुलकावणी आहे अशी टीका करण्यांत येते. परंतु शांतता-संरक्षणाची स्टालिननें उभारलेली मोहीम ही केवळ सोव्हिएतविरोधी युद्धापुरती मर्यादित नाहीं. प्रस्तुत शांततामोहिमेनें साम्राज्यवाद्यांचें सोव्हिएत-विरोधी युद्धाचे डाव हाणून पाडतां आले तरी त्यामुळें जागतिक शांतता टिकेलच असें नाहीं. जोंपर्यंत साम्राज्यवाद जगांत अस्तित्वांत आहे तोंपर्यंत युद्धाचा संभव अटळ आहे. तें युद्ध कदाचित् दुसऱ्या महायुद्धाप्रमाणें पुनश्च साम्राज्य-शाही राष्ट्रांत पेटेल. म्हणूनच वसाहत-जनतेचा स्वातंत्र्याचा लढा, राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा व शांततेचा लढा हे अविभाज्य आहेत, ह्या गोष्टी स्टालिननें कम्युनिस्ट पक्षाच्या १९ व्या काँग्रेसच्या पूर्वतयारीसाठीं लिहिलेल्या 'सोव्हिएत यूनियनमधील समाजवादाचे आर्थिक प्रश्न' ह्या








प्रबंधांत स्पष्ट केलेल्या आहेत. स्टालीन लिहितो :

"आजची शांततामोहीम, ही शांततासंरक्षणाची चळवळ यशस्वी झालीच, तर ती एका विशिष्ट प्रकारचें युद्ध टाळूं शकेल. तें युद्ध कांहीं काळ पुढें ढकलण्यांत, कांहीं काळ विशिष्ट प्रकारची शांतता टिकविण्यांत तिला यश येईल......हें घडून आलें तर उत्तम, फार उत्तम होईल. परंतु तरीहि भांडवलशाही राष्ट्रांमध्यें युद्ध पेटण्याचा सर्वसाधारण अटळ धोका नाहींसा करण्यास तेवढें यश पुरें पडणार नाहीं. कारण शांतता-चळवळीला येणारें वरील सारें यश हिशेबांत घेतलें तरी साम्राज्यशाही कायम राहणार, चालू राहणार आणि म्हणून परिणामीं महायुद्ध अटळ होणें हेंहि कायम राहणार. महायुद्धाचा अटळपणा केवळ सोव्हिएत यूनियनच्या बचावानें नाहींसा होणार नाहीं, तो साम्राज्यशाहीच्या निर्दालनानेंच नाहींसा होणार आहे. हें कार्य युद्धावांचून पार पाडण्यास एकच शक्ति समर्थ आहे. ती म्हणजे जनता. म्हणूनच ज्यांवर जागतिक शांतता अवलंबून आहे त्या साऱ्या बाबी स्पष्ट करून, जागतिक शांततेचें भवितव्य जनतेनें हातीं घ्यावयास पाहिजे. व तें ती घेईल तर जगाला चिरशांतता निश्चितपणें लाभेल."

असा तेजस्वी संदेश कॉम्रेड स्टालिननें जगाला दिलेला आहे. स्टालिनचा हा संदेश प्रत्यक्षांत आणण्यासाठीं झटणें हें जगांतील प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे. कॉ. स्टालिन द्वारें दिलेला हा शांततेचा संदेश म्हणजे नव्या जगाच्या उदयाची मंगल भूपाळीच होय.

---

# शान्ति आणि शक्ति

[ नुकत्याच गेल्या ५ मार्च १९५३ ला गोमटेश्वराला महाभिषेक झाला आणि त्याच दिवशीं स्टॅलिन निधन पावला !

गोमटेशाचें मूळ नांव 'बाहुबली' असें आहे. तो ऋषभदेवाचा द्वितीय पुत्र. ऋषभ हा जैनांचा पहिला तीर्थंकर आणि या युगांतील पहिला धर्मप्रवर्तक. यालाच भागवतांत विष्णूचा अवतार म्हटलें आहे. शैवांचा शिवपुरुष हाच असावा. या शैवी अवस्थेलाच जैन 'केवल कल्याण अवस्था' म्हणतात. ही अवस्था प्राप्त होणें असल्यास शान्ति-उत्तर शक्तीची आवश्यकता फार आहे. शिवरहित शक्तीनें नेहमींच शान्तीला आव्हान दिलें आहे. तो पुरातनकालचा प्रश्न आज आपल्यासमोर पुन्हां अवतीर्ण होऊन आजच्या जगाला आव्हान देत आहे. भारताला विश्वशान्तीची प्रतिष्ठा कशी होईल याचा ध्यास लागला आहे. त्याचें एक उत्तर बाहुबली गोमटेशानें पूर्वी दिलें आहे. हा बाहुबली–गोमटेश–प्रथम कामदेव–यानें आपला वडील भाऊ, ऋषभदेवांचा प्रथम पुत्र जो भरत (ज्याच्यावरून हें आपलें भरतखंड नांव पडलें) त्याच्या चक्रवर्तित्वाकरितां केलेला प्राचीनकालांतील त्याग प्रसिद्ध आहे. त्या त्यागाची महती म्हणजेच म्हैसूर संस्थानांतील श्रवणबेळगोळां-('श्रवणाचें धवलतीर्थ')-तील गोमटेश्वरांचा प्रचंड अद्वितीय पुतळा होय. असे पुतळे म्हैसूर प्रांतांत व भोंवतीं पांच आहेत. सर्वहि अतिमानवी उंचीचे आहेत. बाहुबलीनंतर जगाच्या इतिहासांत अनेक बळी होऊन गेले आहेत व पुढें होतीलहि. हिट्लर, स्टॅलिन एका जातीच्या बळींचे प्रतिनिधी होऊन गेले. त्यांनीं जग हलवून टाकलें. त्यांच्यासमोर स्वतःला 'ट्रूमन' म्हणवून घेणारेहि मागें पडले आहेत !










# शान्ति आणि शक्ति

बाहुबलीचा पुतळा गेलीं हजार वर्षें जशाचा तसा उन्हांत उभा आहे. त्याच्यावर बारा वर्षांनीं एकदां दुग्धाभिषेक होतो. यंदा ज्या दिवशीं गोमटेश्वराला दुग्धाभिषेक झाला, त्याच दिवशीं स्टॅलिन निधन पावल्याचें वृत्त आलें ! ही घटना अकस्मात् असेल का ? भौतिक सृष्टींत सर्वत्र कस्मात्-कारणवादाचें राज्य नांदत असून मानवी घटनेंत मात्र अकस्मात्वादाचें स्तोम माजावें हें विचित्रच. पण तें असो. बळाच्या पूर्व-पक्षाला शान्तीच्या उत्तर-पक्षाचें म्हणणें तरी काय आहे हें पुढच्या संवादांत प्रकट केलें आहे. शक्तीचा विजय शान्त्युत्तर होईल कीं आधीं ? तो शान्त्युत्तरच होईल असें बाहुबलीचें उत्तर आहे. बाहुबलीच्या त्यागावर भारतधर्माची प्रतिष्ठा अवलंबून आहे. पाश्चात्यांचा बळवाद म्हणत आहे कीं आम्ही शान्तीला पृथ्वीवर खेंचून आणूं आणि भारताचा शान्तिवाद म्हणत आहे कीं, आपण या भूमीवरील जीवनाची भूमिकाच उन्नत करूं. याचा विचार मौन स्वीकारून शान्तपणें करणें बरें.—द. रा. बेन्द्रे ]

—**गोमटेशास** अभिषेक झाला
आणि तिकडे स्टालिन मेला
" अर्था-अर्थीं काय संबंध ? "
—घेणाऱ्यास आहे बोध
" बोध काय सर्वत्र आहे ! "
—पण लेकाचा कोण पाहे ?
" बोध झाला सब्जेक्टिव्ह "
—शिव्या देण्यास तेंहि असावं
" तें म्हणजे केवळ भास ! "
—भास भासतो कोणास ?
" अज्ञान्याला ज्ञानाभास "
—ज्ञान झालें मग कोणास ?
" ज्ञान म्हणती विज्ञानास "
—काय म्हणती त्या ज्ञात्यास ?
" त्याचें नांव सायन्टिस्ट
त्याचें ज्ञान विषयनिष्ठ "
—विषयांत नसे विषयनिष्ठा
ती तर करते सदा चेष्टा !
विषयज्ञानी जीवसाक्षी
" तुमचा मार्ग एकपक्षी !
विज्ञान आहे सर्वसाक्षी
जीव जीव तो एकाक्षी "
—जीवा सर्वांत करा शोध ।
एकांत आहे अनेकबोध
" बांधा वाऱ्याचें मोटोळें "
—लोक लोक त्याचे गोळे
" ज्ञान करा सारे गोळा "
—सिद्ध पाही त्याच डोळां
" यानें काय सिद्ध झालें ? "
—बळ धडपडत मेलें !
" साधू-सिद्ध नाहीं मेले ? "
—कीर्तिरूपानें ते ठेले
" स्टालिन् झाला अजरामर "
—आहे कीर्तींत अंतर
" पण गोमटाचा संबंध काय ? "
—होईल शांतीचा उदय
" वा ! हें तात्पर्य कसें आलें "
—अशान्त बळ वायां गेलें
" स्टालिन् पुतळा कर्माचा "
—विजय शेवटीं धर्माचा
" दगडांत काय धर्म राहे ? "
—त्यावरी लोक उभा आहे
" वा रे वा अर्थकोटी
म्हणतां काय मग शेवटीं ? "
—आले कोटी गेले कोटी
शांत मुद्रा ती गोमटी
" स्टालिन् गरीबांचा नेता वाली "
—दाता त्यागी बाहुबली
" खरे आहांत वादिष्ट "
—आम्हां सत्य तेंच इष्ट
" वादास नसतो कधीं अंत "
—मौन धरूं आतां शांत

—द. रा. बेन्द्रे

प्रा. नी. वि. सोवनी

# अंदाजपत्रकांतील तूट व चलनवृद्धि

**भारत-सरकारचे अर्थमंत्री श्री. देशमुख** यांनीं २७ फेब्रुवारी १९५३ रोजीं हिंदुस्थान-सरकारचें १९५३-५४ चें अंदाजपत्रक विधिमंडळास सादर केलें. सरकारचा पुढील वर्षाचा एकंदर आय व्यय यांचा अंदाज करतां त्यांत सुमारें रु. १४० कोटींची तूट येईल. ही तूट भरून काढण्यासाठीं सरकारी शिलकींतून रु. ३० कोटी घेण्यांत येतील व उरलेली रु. ११० कोटींची तूट भरून काढण्यासाठीं मध्यवर्ती पेढीकडून तितकें कर्ज घेण्यांत येईल असें त्यांनीं सांगितलें. पंचवार्षिक योजनेच्या तिसऱ्या वर्षाचें हें अंदाजपत्रक आहे व त्या योजनेप्रमाणें आर्थिक विकासासाठीं योग्य तो खर्च करावयाचा तर अशा प्रकारें येणारी तूट भरून काढणें आवश्यक आहे. तसें न केल्यास विकासाच्या निरनिराळ्या योजनांसाठीं आवश्यक तेवढा पैसा उभारतां येणार नाहीं व पर्यायानें पंचवार्षिक योजना ठराविक मुदतींत पुरी करतां येणार नाहीं. अशा रीतीनें तूट भरून काढण्यांत चलनवृद्धि ( inflation ) निर्माण होण्याचा धोका असतो. सध्यांची देशांतील आर्थिक परिस्थिति व सरकारी धोरण यांचा विचार करतां हा धोका वाटतो तितका मोठा नाहीं, असा श्री. देशमुख यांच्या प्रतिपादनाचा रोख आहे. देशाच्या आर्थिक विकासाच्या दृष्टीनें व सामान्य जनतेच्या दृष्टीनेंहि हा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. त्यासंबंधीं येथें थोडक्यांत विवेचन करण्याचें योजिलें आहे.

या विवेचनास मूलभूत गोष्टी म्हणजे चलन, अर्थव्यवहार, किंमतींचें मान व त्यांचे परस्पर-संबंध या होत. म्हणून त्यांसंबंधीं प्रथम थोडक्यांत विवेचन करणें आवश्यक आहे. कोणत्याहि अर्थ-व्यवस्थेंत, तीमधील मनुष्यबळ व उत्पादक साधनसामग्री यांचा त्यांतील नैसर्गिक संपत्तीवर जो संस्कार होत असतो त्यांतून दरवर्षी कांहीं उत्पादन होत असतें. या उत्पादनाच्या वार्षिक प्रवाहास 'राष्ट्रीय उत्पन्न' असें स्थूलमानानें म्हणतात. स्थूलमानानें राष्ट्रीय उत्पन्न व व्यवहारांतील चलन यांवर त्या अर्थव्यवस्थेंतील किंमतींचें मान ठरत असतें. व्यवहारांतील चलन मुख्यत: मध्यवर्ती सरकारच्या धोरणावर अवलंबून असतें. नियोजित ( planned ) अर्थव्यवस्थेंत राष्ट्रीय उत्पन्न वाढविण्यासाठीं विशिष्ट सरकारी धोरण आंखलेलें असतें. तेथें राष्ट्रीय उत्पन्नहि सरकारी धोरणावर अवलंबून असतें. देशांतील किंमतींचें मान या दोन्ही गोष्टींवर अवलंबून असतें हें उघड आहे. अर्थात् हें विवेचन अत्यंत स्थूल आहे. अनेक विकल्पांचा विस्तारभयास्तव येथें विचार केलेला नाहीं.

आतां चलन व किंमती यांच्या परस्परसंबंधा-विषयीं व त्यांमधील निरनिराळ्या अवस्थांसंबंधीं थोडेसें दिग्दर्शन केलें पाहिजे. यासाठीं चलनविस्तार (expansion of currency), चलनसंकोच (contraction of currency), चलनवृद्धि (inflation) व चलनक्षय (deflation) या संज्ञांचे पृथक् अर्थ समजावून घेतले पाहिजेत. यांपैकीं पहिले दोन प्रकार हे वारंवार घडत असतात. हंगामामध्यें नवीं पिकें वगैरे बाजारांत येऊं लागलीं म्हणजे त्या व्यवहारासाठीं अधिक चलन लागतें व त्यासाठीं मध्यवर्ती पेढीकडून अगर सरकारकडून चलनविस्तार करण्यांत येतो. हंगाम संपला म्हणजे इतकें चलन व्यवहारांत आवश्यक राहत नाहीं. मग मध्यवर्ती पेढी अगर सरकार चलनसंकोच करतें. हा प्रकार प्रतिवर्षी चालत असतो. हा चलनाचा विस्तार व संकोच मुख्यत: हंगामी व तात्पुरता असतो. एकंदर किंमतींच्या मानावर त्याचा परिणाम फारच अल्प प्रमाणांत होतो. चलनविस्ताराच्या व संकोचाच्या जशा हंगामी तशा दीर्घकालीन प्रवृत्तीहि असतात. कांहीं वर्षांच्या कालखंडांत त्या सातत्यानें मूर्त होतात. उदाहरणार्थ, ज्या देशांचा आर्थिक विकास होत आहे व जेथें राष्ट्रीय उत्पन्न सारखें वाढत आहे तेथें वाढत्या अर्थव्यवहारासाठीं वाढत्या चलनाची गरज उत्पन्न होते. अशा परिस्थितींत होणारा चलनविकास आर्थिक विकासास अंगभूतच असतो व त्याचे








अनुक्रमणिका

# अंदाजपत्रकांतील तूट व चलनवृद्धि

परिणाम किंमतींच्या मानावरहि होतात. परंतु हे परिणामहि विकासाच्या अंगोपांगांपैकींच असतात व त्यांचें स्वरूप चलनवृद्धी-( inflation )चें नसतें. याउलट, जागतिक मंदीच्या कालखंडांत आर्थिक व्यवहार मंदावतात, राष्ट्रीय उत्पन्नें कमी होतात; तेव्हां पूर्वीइतकें चलन व्यवहारांत जरूर नसतें व चलनसंकोचाची दीर्घकालीन प्रवृत्ति निर्माण होते. मुख्य ध्यानांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे चलनविस्तार व चलनसंकोच हे अर्थव्यवहारांचे परिणाम म्हणून घडून येतात. त्यांचें स्वरूप कारक म्हणजे अर्थव्यवहार बदलण्यास कारणीभूत होणारें नसतें.

उलट, चलनवृद्धि व चलनक्षय हे कारक स्वरूपाचें म्हणजे अर्थव्यवहारावर परिणाम घडवून आणण्यास कारण होतात. चलनांत फेरफार करून आर्थिक व्यवहाराचें मान बदलण्याच्या खटपटींतून चलनवृद्धि व चलनक्षय या दोन गोष्टी उत्पन्न होतात.

युद्धकाळांत जेव्हां सरकारची सर्व वस्तूंसंबंधींची गरज निकडीची असते त्या वेळीं चालू उत्पादनांतून ही गरज भागविण्यासाठीं, इतर जनता स्वखुषीनें आपल्या खर्चांत बचत करून त्या वस्तू मुक्त करून देईल याची वाट न पाहतां, चलनाची वाढ करून, त्या वस्तू हस्तगत करणें हें सरकारला आवश्यक असतें. या अधिक लागणाऱ्या वस्तू उत्पादनाच्या वाढींतून भरून निघाल्या तर सामान्य जनतेला उपलब्ध असणाऱ्या वस्तूंच्या पुरवठ्यांत फरक पडत नाहीं व तो पूर्वीइतकाच राहतो. त्यामुळें त्यापूर्वी झालेली चलनाची वाढ नवीन वाढलेल्या पुरवठ्याकडून शोषिली जाते व किंमतींचें मान फारसें बदलत नाहीं. अर्थातच चलनवृद्धीहि निर्माण होत नाहीं. परंतु उत्पादनवाढीला कांहीं मर्यादा असतात. उत्पादनाचीं साधनें थोड्या वेळांत फार वेगानें वाढूं शकत नाहींत. युद्धकाळांत तीं थोडीशीं वाढणेंहि पुष्कळ वेळां दूरापास्त असतें. उत्पादनाची वाढ होण्याची जोंपर्यंत शक्यता असते तोंपर्यंत होणारी चलनाची वाढ [illegible] करून चलनवृद्धीचें स्वरूप धारण करीत नाहीं [illegible]ती वाढतात, परंतु त्याबरोबरच उत्पादनहि वाढतें. उत्पादनाची वाढ खुंटली व चलनाची वाढ होत राहिली म्हणजे चलनवृद्धीचा प्रादुर्भाव होतो. ही चलनाची वाढ जशी युद्धखर्चाकरितां तशीच आर्थिक विकासाच्या योजनांसाठींहि होऊं शकते व त्यांतून चलनवृद्धि निर्माण होण्याचा तितकाच धोका असतो. चलनक्षयाचें धोरण याच्या बरोबर उलट असतें. आर्थिक व्यवहारांची पातळी खालीं आणण्यासाठीं व किंमतींचें मान कमी करण्यासाठीं सरकार बुद्ध्या चलन कमी करण्याचें धोरण आंखतें व त्यांतून चलनक्षयाची उत्पत्ति होते. वरील सर्व विवेचनांत ज्यास ‘ उत्पादन ’ असें संबोधिलें आहे, त्यांत परराष्ट्राहून आयात झालेल्या अगर केलेल्या मालाचा व वस्तूंचाहि समावेश होतो. कारण, अशा प्रकारें आलेल्या वस्तूंमुळें देशांतील पदार्थांचा पुरवठा वाढत असतो. अर्थात्, निर्यात केलेल्या मालापेक्षां आयात केलेला माल जास्त असेल तरच ही गोष्ट शक्य होईल, नाहीं तर नाहीं, हें उघड आहे.

युद्धखर्चासाठीं अगर एखादी नियोजनाची योजना पार पाडण्यासाठीं सरकारला नेहमींपेक्षां पुष्कळच मोठ्या रकमेची जरूरी लागते. याचा वास्तविक अर्थ असा कीं, एकंदर राष्ट्रीय उत्पन्नापैकीं पूर्वीपेक्षां बराचसा मोठा भाग सरकारला युद्ध चालविण्यासाठीं अगर विकासयोजना पार पाडण्यासाठीं आपल्या हातीं अगर ताब्यांत घ्यावा लागतो. चालू किंमतींत तो खरेदी करण्यास पुरेसा पैसा उभारून सरकारला ही गोष्ट साध्य करतां येते. पैसा उभारण्याचे स्थूल मानानें तीन मार्ग सरकारला अवलंबितां येतात: ( १ ) कर बसविणें, ( २ ) कर्जे उभारणें, ( ३ ) चलनाची वाढ करणें. कर व कर्जे या रूपानें उभारलेला पैसा हा सामान्य लोकांच्या उत्पन्नांतून करांच्या रूपानें सक्तीनें व कर्जाच्या रूपानें खुषीनें सरकारी खजिन्यांत जमा होतो. पर्यायानें हा पैसा जनतेच्या हातीं राहिला असता तर तो वस्तूंवर खर्च झाला असता. तो सरकारला मिळाला म्हणजे तो खर्च करून सरकारला पाहिजे त्या वस्तू खरेदी करता येतात. कर व कर्जे सरकारला देण्यामुळें सामान्य जनतेचें उत्पन्नहि त्या










मानानें कमी होतें. परंतु सामान्य जनतेस उपलब्ध असणारा वस्तूंचा पुरवठाहि, त्याच प्रमाणांत सरकारनें आधींच खरेदी केल्यामुळें, कमी झालेला असतो व म्हणून किंमतींच्या मानांत फारसा फेर-फार पडत नाहीं. ( येथें उत्पादनवाढीची कमाल मर्यादा गांठली गेली आहे असें गृहीत धरलें आहे.) कर व कर्जे या रूपानें जर सरकारला इष्ट असलेली रक्कम उभारतां आली नाहीं तर सरकार चलनाची वाढ करून ती तूट भरून काढतें व नवीन चलन खर्च करून जरूर त्या वस्तू चालू किंमतींत खरेदी करतें. परंतु अशा प्रकारें खरेदीसाठीं खर्च केलेले पैसे जनतेच्या हातीं जातात व तिचें पैशाच्या स्वरूपांतील उत्पन्न अगर क्रयशक्ति पूर्वीपेक्षां वाढते. परंतु तें उत्पन्न ज्या वस्तूंवर खर्च करावयाचें त्यांचा पुरवठा, सरकारनें नवीन चलनानें आधींच केलेल्या खरेदी-मुळें, अगोदरच कमी झालेला असतो. त्यामुळें, ही वाढलेली क्रयशक्ति व कमी झालेला पुरवठा यांचें समीकरण होण्यासाठीं जरूर तेवढ्या प्रमाणांत किंमती वाढाव्या लागतात आणि मग त्यांतून चलनवृद्धीचें दुष्टचक्र निर्माण होतें.

आणखी एका गोष्टीचा खुलासा पुढील चर्चे-साठीं येथें करणें आवश्यक आहे. ही गोष्ट चलनाच्या वाढीच्या प्रकारासंबंधींची आहे. उत्पादनवाढीची परिसीमा झाल्यावर होणारी चलनाची वाढ चलनवृद्धि निर्माण करते हें वर सांगितलेंच आहे. नवीन चलनाची निर्मिति हा चलन वाढविण्याचा एक प्रकार आहे. पूर्वी सांठविलेल्या आपल्या संचित शिलकेंतून सरकारनें तुटीची तोंडमिळवणी करण्यासाठीं खर्च केला तर निराळ्या प्रकारें चलनाची वाढच होते. प्रथमदर्शनीं यांत विरोधाभास दिसेल. परंतु थोडा खोलवर विचार केला तर वरील विधाना-च्या सत्यतेची खात्री पटेल. थोडा विरुद्ध दिशेनें विचार केला तर याचा उलगडा सुकर होईल. अंदाजपत्रकांतील तुटींचाच आतांपर्यंत विचार केला. अंदाजपत्रकांतील शिलकेचा विचार केल्यास काय दिसेल ? शिलकी अंदाजपत्रकामुळे जनतेच्या हातीं असलेलें चलन कमी होईल व चलनवृद्धि निर्माण होणार नाहीं, हें अगदीं सहज समजण्यासारखें आहे. समजा कीं, अशाच प्रकारें ५-६ वर्षे ओळीनें शिल्लक टाकून एखाद्या सरकारनें पुष्कळ शिल्लक सांचविली व नंतर तुटीचीं अंदाजपत्रकें करून ती तूट या शिलकेंतून खर्चास घेऊन भरून काढली, तर त्याचा काय परिणाम होईल ? शिलकेंतून खर्चासाठीं काढलेली रक्कम सरकारनें खर्च केल्यावर जनतेच्या हातीं जाईल व तिची क्रयशक्ति वाढेल. याचाच अर्थ व्यव-हारांतलें चलन वाढेल. शिलकेंतील बंदिस्त पैसा मोकळा होऊन जनतेच्या हातीं येईल व तो तिच्याकडून खर्च होऊं लागला म्हणजे चलन-वृद्धीस पोषक परिस्थिति निर्माण होईल. वरील चर्चेत 'सरकारी शिलकेंत असलेला पैसा' असें ज्यास म्हटलें आहे, तो प्रत्यक्ष नाणीं अगर कागदी चलन या स्वरूपांत बहुधा नसतो. रोख्यांच्या रूपानें अगर फडणिशी शिलकेच्या रूपानें अगर परदेशी हुंडणावळीच्या रूपानेंच मुख्यतः अशाप्रकारची शिल्लक ठेविली जाते हें लक्षांत ठेवावें. युद्धकालांत हिंदुस्थान-सरकारनें सांठविलेल्या जवळजवळ रु. ५३० कोटींच्या शिलकेस पौंडी रोख्यांचेंच तारण होतें. म्हणजे स्थूलमानानें ती पौंडी रोख्यांच्या स्वरूपांतच होती, ही गोष्टहि पुढील चर्चेच्या दृष्टीनें येथें सांगणें आवश्यक आहे. हिंदुस्थान-सरकारनें आपल्या संचित शिलकेंतून खर्च केला याचा अर्थ युद्धकालांत सांठलेल्या स्टर्लिंग शिलकेंतून खर्च केला असा आहे. स्टर्लिंग शिलकेंतून प्रतिवर्षी किती खर्च करतां येईल हें हिंदुस्थान व इंग्लंड यांमध्यें यासंबंधीं झालेल्या कराराप्रमाणें ठरलेलें आहे हें सर्वांस विदितच आहे.

वरील चर्चेच्या अनुषंगानें आतां श्री. देशमुख यांच्या १९५३-५४ च्या अंदापत्रकासंबंधीं विचार करावयाचा आहे. तो करण्याच्या आधीं या अंदाजपत्रकाची पार्श्वभूमि म्हणून यापूर्वीच्या ५-६ वर्षांतील अंदाजपत्रकांसंबंधीं थोडी माहिती देणें आवश्यक आहे. १९४८-४९ ते १९५१-५२ या वर्षांतील अंदाजपत्रकें, त्यांतील तूट व त्यांचा देशांतील अर्थव्यवहारांवर झालेला परिणाम



अनुक्रमणिका








यांचें येथें विवेचन करतों. (१९५२-५३ चे निश्चित आंकडे अद्याप हातीं आलेले नाहींत.)

देशांतील व देशाबाहेरील सरकारी आय व्ययाचे आंकडे सरकारी अंदाजपत्रकांत एकत्रच दिलेले असतात. ते निराळे करून अन्तर्गत तूट कां काढावी लागते हें सांगणें आवश्यक आहे. सरकारला मिळणारी परदेशी हुंडणावळ व तिचा परदेशांत होणारा खर्च यांचा देशांतील जनतेच्या क्रयशक्तीवर प्रत्यक्ष परिणाम होत नाहीं. कारण, ते सर्व व्यवहार परदेशांत व तेथल्या लोकांशीं होतात. यासाठीं सरकारी आय-व्ययाचा अन्तर्गत परिस्थितीवर होणारा प्रत्यक्ष परिणाम अजमावण्यासाठीं त्याच्या परराष्ट्रीय आय-व्ययाची वजावाट करूनच अन्तर्गत तूट काढावी लागते. ही अन्तर्गत तूट म्हणजे रुपयांतील आय व व्यय यांतील तूट होय. ती या चार वर्षांत किती होती हें खालीं कोष्टकांत दाखविलें आहे.[1] त्यावरून १९५०-५१ सालाखेरीज इतर तीन वर्षांत अंदाजपत्रकांत अंतर्गत तूट होती हें त्या कोष्टकावरून दिसेल.

ही तूट सरकारनें कशी भरून काढली हा पुढचा महत्त्वाचा प्रश्न. १९४८ ते १९५२ या वर्षांत सरकारनें फारसें नवीन चलन काढलें असें दिसत नाहीं. तेव्हां ही जवळजवळ रु. १७७ कोटींची अंतर्गत तूट नवीन चलनानें भरून निघालेली नाहीं. ही तूट सरकारनें आपल्या संचित शिलकेंतून खर्च करून बहुतांशीं भरून काढली आहे. नवीन चलन काढून अगर शिलकेंतून खर्च करून तूट भरून काढली तर त्याचे परिणाम सारखेच असतात, याचें विवेचन वर केलेंच आहे. तेव्हां अशा प्रकारें तूट भरून काढल्यामुळें जनतेची क्रयशक्ति वाढणें क्रमप्राप्तच आहे. मग त्याचा किंमतींच्या मानावर परिणाम झाला कीं नाहीं व त्यांतून चलनवृद्धि निर्माण झाली कीं काय, हे प्रश्न उत्पन्न होतात. या प्रश्नांना उत्तर

---

१. पुढील कोष्टकांत चार वर्षांतील हिंदुस्थान-सरकारच्या अंदाजपत्रकांतील एकंदर तूट व सरकारी परदेशी आय-व्ययांतील तूट यांचे आंकडे दिले आहेत व त्यांची वजावट करतां अंतर्गत तूट किती हेंहि दाखविलें आहे.

(आंकडे कोटी रुपयांचे. तूट–; शिल्लक +)

| | हिंदुस्थान-सरकारच्या अंदाजपत्रकांतील एकंदर तूट | हिं. सरकारच्या परराष्ट्रीय आय-व्ययांतील तूट. | अंतर्गत तूट. |
|---|---|---|---|
| १९४८–४९ | – ८२ | – ३६ | – ४६ |
| १९४९–५० | – ४४ | – २८ | – १६ |
| १९५०–५१ | + १२ | – ६८ | + ८० |
| १९५१–५२ | – ४ | + ३१ | – ३५ |

या कोष्टकांतील बेरीज-वजाबाकी लक्षांत येण्यासाठीं एक साधें उदाहरण घेतां येईल : समजा कीं, तुम्ही ज्या गांवांत राहतां त्या गांवांतून तुम्हांला रु. ४० उत्पन्न मिळतें. पण तुमचे ७० रु. गांवांतच खर्च होतात. म्हणजे तुमच्याकडे रु. ३० ची तूट राहते. याशिवाय गांवाबाहेरून तुम्हांला रु. ८० इतकें उत्पन्न येतें. परंतु तुमचा गांवाबाहेरचा खर्च रु. १०० आहे. म्हणजे गांवाबाहेरील उत्पन्न व खर्च यांत तुम्हांला रु. २० ची तूट येते. तुमचा गांवांतला व गांवाबाहेरचा सर्व व्यवहार जमेस धरला तर तुमचें एकंदर उत्पन्न रु. १२० व एकंदर खर्च रु. १७० आहे व एकंदर तूट रु. ५० ची आहे. या उदाहरणांत तुमची एकंदर व्यवहारांतील एकंदर तूट रु. ५० आहे, गांवाबाहेरच्या व्यवहारांतील तूट रु. २० आहे असें सांगितल्यास, तुमच्या गांवांतील व्यवहारांतील तूट अगर शिल्लक काढावयाची असल्यास जसें गणित कराल तसेंच वरच्या कोष्टकांत हिंदुस्थान-सरकारच्या हिंदुस्थानांतील अन्तर्गत आय-व्ययांतील तूट काढण्यासाठीं केलेलें आहे.








देण्यापूर्वी मागें उल्लेखिलेल्या आणखी दोन गोष्टींचा विचार केला पाहिजे : ( १ ) परदेशीय व्यवहारांतून देशांत निर्यातीपेक्षां आयात जास्त होऊन देशातील वस्तूंचा पुरवठा वाढला कीं काय ? ( २ ) त्याचप्रमाणें देशांतील उत्पन्नाची वाढ होऊनहि हा पुरवठा वाढला कीं काय ? त्याशिवाय या तुटीच्या तोंडमिळवणीचे काय परिणाम झाले हें तपासतां येणार नाहीं.

वर उल्लेखिलेल्या दोन गोष्टींपैकीं उत्पादनाच्या वाढीसंबंधीं उपलब्ध असलेले आंकडे तितकेसे परिपूर्ण नाहींत. औद्योगिक उत्पादन गेल्या २-३ वर्षांत वाढलें आहे हें स्पष्ट दिसतें. परंतु शेतीचें उत्पादन वाढलें आहे कीं काय यासंबंधींच्या आंकड्यांत मेळ घालून त्यावरून निश्चित अनुमान काढणें कठीण आहे. तेव्हां उत्पादनवाढ झाली न झाली यासंबंधींच्या वादांत न पडतां देशांतील एकंदर उत्पादित वस्तूंचा सांठा या काळांत होता तेवढाच राहिला, फारसा वाढला नाहीं, परंतु कमी निश्चितपणें झाला नाहीं, असें आपण समजूं.

दुसरी गोष्ट परदेशांतून आलेल्या जादा आयातीची. खालील कोष्टकांत [२] त्यासंबंधींची उपलब्ध माहिती दिली आहे. हिंदुस्थानच्या परदेशीय आय-व्ययांतील तुटीचे आंकडे प्रथम दिले असून, त्याच्या शेजारीं हिंदुस्थान-सरकारच्या अंदाज पत्रकांतील अन्तर्गत व्यवहारांतील पूर्वी काढलेली तूट दिली आहे. देशाच्या एकंदर परदेशीय आय-व्ययांतून सरकारी परदेशी आय-व्ययांचे आंकडे ( त्यांचा विचार अंदाजपत्रकांतील अन्तर्गत तूट काढतांना केला असल्यामुळें ) वजा करून आलेले आंकडे या कोष्टकांत दिलेले आहेत, हें येथें नमूद केलें पाहिजे.

१९५०-५१ साल सोडल्यास इतर तिन्हीं वर्षांत हिंदुस्थान-सरकारच्या अंदाजपत्रकांतील अन्तर्गत तूट शिलकेंतून खर्चास घेऊन भरून काढण्यांत आली. त्यामुळें जनतेच्या हातांतील चलन तेवढ्यानें वाढलें हें निःसंशय. परंतु त्याच वेळीं परदेशाहून येणाऱ्या जादा आयातीमुळें देशांतील वस्तूंचा पुरवठा जास्त प्रमाणांत वाढला होता. त्यामुळें वाढलेल्या क्रयशक्तींतील सुप्त चलनवृद्धि हतप्रभ झाली. १९५०-५१ सालीं अंदाजपत्रक मुळांतच शिलकेचें होतें व त्या वर्षीं झालेल्या जादा निर्यातीचा व त्या शिलकेचा छेद गेला असें दिसतें. या सर्व वर्षांचा एकत्रित विचार केल्यास हिंदुस्थान-सरकारच्या अंदाजपत्रकांतील तुटींच्या तोंडमिळवणीमुळें चलनवृद्धीस उत्तेजन मिळालेलें नाहीं, हें स्पष्ट दिसतें.

तथापि, या काळांतील किंमतींच्या चढ-उताराकडे दृष्टिक्षेप केल्यास थोडेसें निराळें चित्र दिसेल. घाऊक किंमतींचा सूचकांक एप्रिल १९४८ मध्यें ३४० होता, तो एप्रिल १९५१ मध्यें ४५७·५ पर्यंत वर चढला व त्यानंतर उतरावयास लागून पुढें तो इतक्या झपाट्यानें उतरला कीं मार्च १९५२ मध्यें तो ३७७·५ पर्यन्त गेला होता ! चलनवृद्धीस अन्तर्गत परिस्थिति अनुकूल नसतांना असें कां झालें ? याचें उत्तर असें आहे कीं, देशांतील किंमतींच्या मानावर अन्तर्गत घटनांप्रमाणें बाहेरील घटनांचा, सार्वराष्ट्रीय घटनांचाहि परिणाम होत असतो. सूचकांकांत वर उल्लेखिलेले चढ-उतार हे मुख्यतः बहिर्गत घटनांमुळें झालेले आहेत. रुपयाचें सप्टेंबर १९४९ मधील अवमूल्यन व कोरियांतील युद्ध या गोष्टींमुळें किंमतींचें मान चढत गेलें व त्या

---

२. (आंकडे कोटी रुपयांचे. तूट – शिलक +)

| | हिंदुस्थानच्या ( सरकार सोडून ) परदेशी आय-व्ययांतील तूट. | हिं. सरकारच्या अंदाजपत्रकांतील अन्तर्गत तूट |
|---|---|---|
| १९४८-४९ | – १७८ | – ४६ |
| १९४९-५० | – ४५ | – १६ |
| १९५०-५१ | + ८४ | + ८० |
| १९५१-५२ | – १५७ | – ३५ |








घटनांची पहिली ऊर्मि शमल्यावर तें खालीं आलें असें स्थूलमानानें दिसतें. किंमतींचा या कालांतील चढ-उतार चलनवृद्धि अगर चलनक्षय यांमुळें घडून आलेला दिसत नाहीं.

आतां १९५३-५४ च्या अंदाजपत्रकासंबंधीं विचार करूं. या अंदाजपत्रकांतील एकंदर तूट रु. १४० कोटींची आहे हें प्रारंभींच सांगितलें आहे. जमेच्या बाजूस रु. १०० कोटींहून अधिक रक्कम कर्ज उभारून मिळविण्यांत येईल असें गृहीत धरलें आहे. हा अंदाज बरोबर ठरला नाहीं तर अपेक्षिलेली तूट वाढेल अगर कमी होईल. प्रस्तुत चर्चेसाठीं असें धरून चालूं या कीं, अंदाज बरोबर येऊन रु. १४० कोटींचीच तूट येईल. अर्थातच ही तूट हिंदुस्थान सरकारच्या अंतर्गत व बहिर्गत आय-व्ययांतील मिळून आहे. अंदाजपत्रकाचा चलनवृद्धीच्या दृष्टीनें विचार करण्यासाठीं सरकारच्या या वर्षीच्या परदेशीय आय व्ययांतील तुटीची एकंदर तुटींतून वजावाट करून, मागल्याप्रमाणें अंतर्गत तूट किती हें काढलें पाहिजे. अंदाजपत्रकासोबतच्या खुलाशाच्या पत्रिकेवरून १९५३-५४ या सालांत सरकारच्या परदेशी आय-व्ययांत रु. १८६ कोटींची तूट पडेल असें दिसतें. एकंदर रू. १४० कोटींच्या तुटींतून ही रु. १८६ कोटींची तूट वजा केल्यास अंतर्गत आय व्ययांत सरकारला रु. ४६ कोटी शिल्लक उरतील असें दिसेल. म्हणजे मुख्य तूट परदेशी व्यवहारांतच आहे. परदेशी व्यवहारामधली ही मोठी तूट कशी भरून काढतां येईल हेंहि समजून घेतलें पाहिजे. त्याशिवाय श्री. देशमुखांनीं केलेल्या प्रतिपादनाचा जो सारांश लेखारंभीं दिलेला आहे, याचें मर्म लक्षांत येणार नाहीं.

परदेशी व्यवहारांतील ही रु. १८६ कोटींची तूट मुख्यतः परदेशी हुंडणावळीनें भरून काढावयाची आहे. सरकारला अगर जनतेला लागणारी परदेशी हुंडणावळ मध्यवर्ती पेढी-( Reserve Bank ) कडून विकत घ्यावी लागते. हिंदुस्थान-सरकारला रु. १८६ कोटींची परदेशी हुंडणावळ या वर्षी मध्यवर्ती पेढीकडून विकत घ्यावी लागेल व त्यासाठीं तिला त्या किंमतीचे रुपये द्यावे लागतील. हे रुपये हिंदुस्थान-सरकार कोठून आणील ?

अन्तर्गत व्यवहारांत सरकारला रु. ४६ कोटींची शिल्लक राहील हें आपण वर पाहिलेंच आहे. हे रु. ४६ कोट देऊन तितक्याच किंमतीची परदेशी हुंडणावळ सरकारला खरेदी करतां येईल. उरलेल्या रु. १४० कोटींपैकीं रु. ३० कोटी सरकारी शिलकेंतून खर्च टाकून तेवढी परदेशी हुंडणावळ खरीदण्यांत येईल. हिंदुस्थान-सरकारची संचित शिल्लक मुख्यतः परदेशी हुंडणावळीच्या स्वरूपांतच आहे हें मागें एका ठिकाणीं सांगितलेंच आहे. तेव्हां त्यांतून रु. ३० कोटी खर्चास सरळच घेतां येतील. तथापि अजूनहि रु. ११० कोटींची तूट राहतेच. ही तूट भरून काढण्यासाठीं सरकारला तेवढ्या रकमेचें कर्ज मध्यवर्ती पेढीकडून घ्यावें लागेल. याचा अर्थ असा कीं, रु. ११० कोटींचे आपले नवे कर्जरोखे हिंदुस्थान-सरकार मध्यवर्ती पेढीला विकील व त्याबद्दल रु. ११० कोटींची परदेशी हुंडणावळ घेईल व आपले परदेशांतील व्यवहार पूर्ण करील. श्री. देशमुखांनीं सरकारला रु. ११० कोटींचें कर्ज मध्यवर्ती पेढीकडून काढावें लागेल असें जें सांगितलें, त्याचा हा अर्थ आहे.

परंतु त्याचे परिणाम काय होतील ? मध्यवर्ती पेढीस रु. १८६ कोटींची परदेशी हुंडणावळ हिं. सरकारास पुरवावी लागेल. ती तिला कोणत्या मार्गानें पुरवितां येईल ? तिच्याजवळ जरी सरासरी रु. ८०० कोटींची स्टर्लिंग गंगाजळी आहे, तरी हिं. सरकार व इंग्लंड यांमध्यें झालेल्या करारा-प्रमाणें, त्यांपैकीं प्रतिवर्षी रु. ५० कोटीच ( ३½ कोटी पौंड ) खर्चास घेतां येतात. म्हणजे रु. १३६ कोटींची तिनें इतरत्र व्यवस्था केली पाहिजे. ही हुंडणावळ तिला हिंदुस्थानांतून परदेशीं निर्यात करणारांच्याकडून खरेदी करावी लागेल. म्हणजे तितके रुपये खर्च होतील व तें चलन जनतेच्या हातीं येईल. हे रुपये खर्च करतांना, रु. ४६ कोटींची हिं. सरकारच्या यंदाच्या अंदाजपत्रकांतील अन्तर्गत आय-व्ययांतील शिल्लक मध्यवर्ती पेढीस वापरतां येईल व रु. ९० कोटी इतकें नवीन चलन काढावें लागेल.








चलनवृद्धीस पोषक अशाच या घटना आहेत. परंतु परदेशी हुंडणावळ खर्चून हिं. सरकार धान्य, यंत्रें वगैरे वस्तूंची परदेशांत खरेदी करील. त्यांत अन्नधान्याचा फार मोठा भाग आहे. या वस्तूंच्या आयातीमुळें देशांतील वस्तूंचा, विशेषतः भोग्य वस्तूंचा पुरवठा वाढेल. सध्यां उपलब्ध असणाऱ्या माहितीवरून चलनाची वाढ व भोग्य वस्तूंच्या पुरवठ्याची वाढ या तुल्यबल ठरतील असें वाटतें. म्हणून यंदाच्या अंदाजपत्रकांतील तुटीची तोंडमिळवणी करण्यासाठीं चलनाची वाढ झाली तरी त्यांतून चलनवृद्धीची परिस्थिति निर्माण होईल असें सध्यां तरी वाटत नाहीं.

वरील चर्चेवरून एक गोष्ट स्पष्ट आहे. तुटीचें अंदाजपत्रक हें या वर्षी आहे व मागें नव्हतें असें नाहीं. युद्धोत्तर कालांतील बहुतेक वर्षी अंदाजपत्रकें तुटीचींच होतीं. यंदाचेंहि तसेंच आहे. फरक इतकाच कीं, या वर्षीपर्यंत पूर्वीच्या शिलकेंतून खर्चास घेऊन हिंदुस्थान-सरकारला तूट भरून काढतां येत होती. ही शिल्लक आतां संपल्यामुळें तूट भरून काढण्यासाठीं मध्यवर्ती पेढीकडून कर्ज घेणें यापुढें सरकारला आवश्यक झालें आहे. तूट भरून काढण्याचे हे दोन मार्ग आहेत व त्यांचे आर्थिक परिणाम सारखेच असतात हें पूर्वी सांगितलेंच आहे. तेव्हा यंदापासून सरकार या दुसऱ्या पद्धतीनें तूट भरून काढणार असल्यानें कांहीं मूलतःच निराळें झालें आहे अगर होणार आहे असें नाहीं.

यासंबंधीं शेवटची महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदुस्थान-सरकारला येणारी तूट ही मुख्यतः आर्थिक विकासासाठीं खर्च होत असल्यामुळें येणारी आहे. युद्धकालांत येणारी तूट युद्धखर्चासाठीं येते व त्या होणाऱ्या खर्चांतून संरक्षण झालें तरी आर्थिक विकास होण्याचा संभव नसतो. उलट, आर्थिक विकासासाठीं होणारा खर्च व त्यांत येणारी तूट हीं उत्पादक स्वरूपाचीं असतात. तात्काळ नाहीं, तरी कांहीं काळानें विकासयोजना फलद्रूप होऊन त्यांतून नवीन उत्पादनाचा प्रवाह सुरू होईल अशी आशा असते. त्यामुळें राष्ट्रीय उत्पन्न वाढून देश अधिक सुसंपन्न होईल अशी अपेक्षा निर्माण होते. हिंदुस्थान-सरकारच्या अंदाजपत्रकांतील तुटीचें स्वरूप अशा प्रकारचें आहे व त्यांची तोंडमिळवणी करण्यांत आर्थिक विकासाचाच हेतु मूलभूत आहे, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

---

## अमेरिकेंतील गुन्हेगारीचें प्रमाण

' युनायटेड स्टेट्स् फेडरल ब्यूरो ऑफ इन्व्हेस्टिगेशन 'नें जाहीर केलें कीं, १९५२ सालांत अमेरिकेंत २० लाख गंभीर स्वरूपाचे फौजदारी गुन्हे घडलेले असतील. ( म्हणजे ७५ नागरिकांमागें १ असें प्रमाण गुन्ह्याचें पडतें). १९५२ च्या पहिल्या सहा महिन्यांतील गुन्ह्यांसंबंधीं रिपोर्ट सादर करतांना, सदरहू ब्यूरोनें लिहिलें आहे : " रोजच्या जीवनांतला एक सर्वसाधारण दिवस घेतला असतां असें आढळून येईल कीं, दर २६ सेकंदांना मालाची चोरी, दर २·४५ मिनिटाला मोटर-चोरी, दर ६·२३ मिनिटाला गंभीर मारामारी, दर अर्ध्या तासामागें कुणा तरी स्त्रीवर बलात्कार, आणि दर ४·६ मिनिटांनीं खुनाचा गुन्हा किंवा पुरुषाची हत्या यांपैकीं कोणती तरी एक गोष्ट घडलेली आढळून येईल. पकडलेल्यांत साधारणतः १८ वर्षांचें कोंवळे तरुणच संख्येनें अधिक होते.

वरील माहिती देऊन, ' अवेक ' हें अमेरिकेंतील पाक्षिक ( ८ नोव्हें. १९५२ ) म्हणतें— " कदाचित् तुम्हांला आश्चर्य वाटत असेल तर ध्यानांत असूं द्या, अमेरिका स्वतःस अजूनहि खिश्चन राष्ट्र म्हणविते! "

## अमेरिकेंतील धार्मिक पंथ

१९५२ च्या ' यिअर बुक ऑफ अमेरिकन चर्चेस 'नें प्रसिद्ध केलें आहे कीं, अमेरिकेंत २५२ धार्मिक पंथ ( रिलीजिअस बॉडीज ) आहेत. यांपैकीं ६७ धार्मिक पंथच असे आहेत कीं, ज्यांचे अनुयायी प्रत्येकीं ५०,००० च्या वर आहेत.

ब्रुक्लिन येथील वॉचटॉवर मिशननें २५० धार्मिक संस्थांना एक प्रश्न विचारला होता : ' प्रलयकाल केव्हां तरी येणार आहे काय? '. या प्रश्नास २०८ संस्थांनीं होकारार्थी, १४ संस्थांनीं नकारार्थी उत्तर दिलें आणि २८ संस्थांनीं उत्तर दिलें नाहीं.

# भारतीय रेल्वेचा गेल्या शंभर वर्षांतील विकास

एप्रिल १९५३ या महिन्यांत भारतीय रेल्वे होऊन बरोबर शंभर वर्षे होतात. परकीय प्रेरणेनें आणि परकीय पैशानें सुरू झालेला हा उपक्रम आज भारत-सरकारच्या स्वतःच्या मालकीचा सर्वांत मोठा धंदा झालेला आहे. सुमारें ८५० कोटी रुपये भांडवल गुंतलेला हा धंदा भारतांतच नव्हे तर अवघ्या आशिया खंडांत सर्वांत मोठा असून, जगांतील मोठ्यांत मोठ्यापैकीं एक आहे. मुख्यतः आक्रमक लष्करी हालचाली सुकर व्हाव्या आणि परकीय मुलकी अम्मल दृढ व्हावा यांसाठीं अपरंपार पैसा ओतून बांधलेले हे लोहमार्ग सुमारें १० लाख भारतीयांच्या उपजीविकेचें साधन झालें असून, राष्ट्रीय संपत्ति आणि संस्कृति यांच्या संवर्धनाचें कार्य पार पाडीत आहेत.

## भारतांतील पहिली रेल्वे

इ० स० १८०४ च्या सुमारास इंग्लंडमध्यें प्रथम खाणींमध्यें हातगाड्यांतून कोळसा वाहून नेण्यासाठीं लोहमार्गाचा उपयोग करण्यांत आला. परंतु वाफेच्या इंजिनांनीं चालणाऱ्या आणि उतारू आणि माल वाहून नेणाऱ्या गाड्या ओढण्यासाठीं अशा मार्गांचा उपयोग इंग्लंडमध्यें प्रथम १८२५ सालीं झाला. स्टॉक्टन व डार्लिंग्टन या गांवांना जोडणारा हा फाटा होता. हिंदुस्थानांतहि १८३१-३२ च्या सुमारास जनावरें जुंपलेल्या गाड्यांसाठीं मद्रास इलाख्यांत कावेरीपट्टम व करूर या गांवांमध्यें रूळ घालावे अशी कल्पना निघाली होती. परंतु प्रवासी व मालगाड्यांसाठीं रूळ घालण्याच्या कल्पनेस मूर्तस्वरूप १८४४ सालीं आलें. त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकमंडळांनीं कलकत्ता आणि मुंबई या शहरांच्या आसपास लहान फाटे प्रयोगादाखल मंजूर केले.

मात्र रेल्वे सुरू करण्यास नुसती संमति देऊन भागण्यासारखें नव्हतें. कंपनीच्या चालकांची कल्पना अशी होती कीं, हिंदुस्थानांत जमीन मोफत देऊं केली कीं रेल्वेंना लागणारें भांडवल आपो-आप निर्माण होईल. परंतु त्या वेळची एकंदर अनिश्चित परिस्थिति व हिंदुस्थानांत या उपक्रमास व्यावहारिक यश मिळेल कीं नाहीं याची अनिश्चिति यांमुळें, कांहीं विशेष प्रलोभन दिल्या-शिवाय भांडवल जमणें अशक्य झालें. आणि हें प्रलोभन म्हणजे गुंतलेल्या भांडवलावर एका ठराविक व्याजाची हमी हिंदी सरकारनें देणें हें होतें. परंतु ब्रिटिश सरकार अशी हमी देऊन स्वतःला बांधून घेण्याच्या विरुद्ध होतें. या विरोधा-मुळें रेल्वेचा प्रश्न बारगळणार कीं काय अशी भीति उत्पन्न झाली होती. अशा वेळीं लॉर्ड डलहौसी हिंदुस्थानांत आले. लॉर्ड डलहौसी हे इंग्लंडच्या बोर्ड ऑफ ट्रेडचे एक माजी अध्यक्ष असल्यानें रेल्वेव्यवहारांशीं त्यांचा घनिष्ठ संबंध होता व त्यांना रेल्वेचें महत्त्व पूर्णपणें पटलें होतें. त्यांनीं आल्या-बरोबर दोन वर्षांच्या आंत मुंबई व कलकत्ता या शहरांजवळच्या लहान फाट्यांच्या चालकांशीं योग्य स्वरूपाचे करार केले व ग्रेट इंडियन पेनिन्सुला व ईस्ट इंडियन या रेल्वे कंपन्यांचें काम जोरानें सुरू झालें. मद्रासजवळ एक फाटा सुरू करण्याच्या उद्देशानें मद्रास रेल्वे कंपनीशींहि करार झाला. या तिहींपैकीं पहिला मार्ग पूर्ण झाला तो मुंबई ते ठाणें हा सुमारें २२ मैल लांबीचा. तो १६ एप्रिल १८५३ रोजीं सार्वजनिक रहदारीस खुला झाला.

या उद्घाटनाच्या समारंभाचें मनोरंजक वर्णन त्याच सालीं प्रसिद्ध झालेल्या 'लोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन' या कृष्णशास्त्री भाटवडेकर यांच्या छोट्या पुस्तकांत दिलें आहे (य. न. केळकर—'स्वराज्य'—ता. ७-३-५३): "कित्येक साहेब-लोक व मुंबईतील मोठमोठाले गृहस्थ मिळून पांचशें आसामी या समारंभांत सन्मानार्थ आले होते. मौज पाहाण्यासाठीं बोरीबंदरपासून तों थेट भायखळ्यापर्यंत मोठीच गर्दी झाली होती. साडे-तीन वाजल्याबरोबर राजकीय सलामीची डोंगरी किल्ल्याच्या तटावरून तोफांची सरबत्ती झाली....

त्या रांगे-( Train )ला तीन आगीच्या गाड्या लावल्या होत्या. त्यांनीं ती रांग ओढली. गाडी मोठ्या डौलानें निघाली तेव्हां तेथें जमलेल्या हजारों लोकांच्या समुदायास मोठेंच साल्हाद आश्चर्य वाटलें..... पाणी घेण्याकरितां शिवेपलीकडे जो विसावा घेतला त्यामुद्धां ठाण्यापर्यंत जाणाऱ्या या अल्पप्रवासास सत्तावन्न मिनिटांचा वेळ लागला. १८५८ सालीं मुंबई ते पुणें या प्रवासाचे दर पुढीलप्रमाणें होते : १ ला वर्ग–रु. १०-९-६, २ रा वर्ग–रु. ७-१-० व ३ रा वर्ग–रु. १-१२-३. मुंबई ते खोपोलीच्या दरम्यान चार गाड्या सुटत.. त्या ७१ मैलांच्या प्रवासास सुमारें २॥ तास लागत.'' तिसऱ्या वर्गांतून प्रवास करणारांचे हाल आजच्यासारखेच होते व बायकांना स्वतंत्र डबा नसल्यामुळें वांड पुरुषांचा त्रास सहन करावा लागे.

हिंदुस्थानांतील रेल्वेबांधणीस खरी चालना, लॉर्ड डलहौसींनीं ब्रिटिश संचालकांकडे २० एप्रिल १८५३ रोजीं जो महत्त्वाचा खलिता पाठविला त्यामुळें मिळाली. हिंदुस्थानांत रेल्वेची आवश्यकता प्रतिपादतांना त्यांनीं पुढील मुद्दे मांडले : इंग्लंडला अत्यंत आवश्यक असणारा कापसासारखा कच्चा माल हिंदुस्थानांत मुबलक आहे. परन्तु तो निर्यातीसाठीं बंदरापर्यंत त्वरेनें आणतां येत नाहीं. तसेंच, ब्रिटिश पक्क्या मालाला हिंदुस्थानांत भली-मोठी बाजारपेठ आहे, पण तेथपर्यंत माल पोंच-विण्याचें साधन उपलब्ध नाहीं. रेल्वेमुळें ह्या अडचणी दूर होतील. शिवाय, राजकीय आणि लष्करी कारणांकरितांहि रेल्वेची आवश्यकता आहे. सरकार या कामाकडे लक्ष पुरविणें आपलें कर्तव्य समजत नाहीं, तेव्हां खासगी कंपन्यांनीं यांत भांडवल गुंतवावें म्हणून ज्या सवलती व हमी त्यांना द्याव्या लागतील त्या त्यांना देणें जरूर आहे. डलहौसींच्या या खलित्याचा योग्य तोच परिणाम झाला आणि खासगी कंपन्यांच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थानांत रेल्वेबांधणी धडाडीनें सुरू झाली.

भारतीय रेल्वेंच्या विकासाचे सामान्यतः सहा कालखंड पाडतां येतील : ( १ ) जुनी हमीपद्धत ( २ ) सरकारी कारभार ( ३ ) नवी हमी-पद्धत व संमिश्र व्यवस्था ( ४ ) करारसमाप्ति व राष्ट्रीयी-करण ( ५ ) फाळणी व संघीकरण ( ६ ) व पंच-वार्षिक योजना.

**खासगी कंपन्यांकडून सरकारकडे**

१८५४ ते १८६० चे दरम्यान हिंदुस्थान-सरकारनें आठ ब्रिटिश कंपन्यांशीं हिंदुस्थानांत रेल्वे बांधण्याचे करार केले. या कंपन्यांशीं झालेल्या करारांचें स्वरूप साधारणपणें पुढीलप्रमाणें होतें : ( १ ) सरकारनें रेल्वेकरितां लागणारी जमीन फुकट देणें. ( २ ) गुंतलेल्या भांडवलावर द. द. शेंकडा ४॥ ते ५ टक्के व्याज मिळण्याची हमी. आणि तें व्याज १ रुपयास २२ पेन्स दरानें मिळणें. ( रुपयाची किंमत घटत होती म्हणून हा दर आगाऊच ठरविण्यांत आला. ) ( ३ ) सरकारनें ही हमी पुरी करण्याकरितां जर स्वतःची रक्कम खर्च केली असेल तर तिची फेड कंपन्यांना जादा नफा झाल्यास त्याच्या निम्म्यातून करणें व बाकीचा जादा नफा कंपन्यांना देणें. ( ४ ) नोकरांची नेम-णूक सोडून बाकीच्या बाबतींत सरकारी नियंत्रण. ( ५ ) २५ किंवा ५० वर्षांनंतर रेल्वे योग्य किंमत देऊन विकत घेण्याचा सरकारला अधिकार.

या करारांवर सर्व बाजूंनीं टीका झाली. भांडवली खर्चावर सरकारचें नियंत्रण नसल्यानें कंपन्यांनीं रेल्वेमध्यें भरमसाट पैसा गुंतविला व त्या प्रमाणांत हिंदुस्थानवर व्याजाचा बोजा वाढला. कंपन्यांचें व्याज सुरक्षित असल्यानें काटकसर कर-ण्याचें कोणतेंच कारण उरलें नाहीं. शिवाय, ५ टक्के व्याज फार होतें अशीहि टीका झाली. सरकार जरी म्हणत होतें कीं व्याजाची हमी दिल्याशिवाय भांडवल मिळणें शक्य नाहीं, तरी सरकारचा हा दावा निखालसपणें सिद्ध झालेला नव्हता. कारण, मि. वुइल्यम थॉर्न्टन यांनीं पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देतांना असें म्हटलें आहे कीं, "हमीशिवायहि हें भांडवल मिळालें असतें. हिंदुस्थानची भरभराट होत आहे आणि जें भांडवल अगतिकतेनें दक्षिण अमेरिकेकडे जात आहे तें हिंदुस्थानकडे जाऊं शकलें नसतें हें संभवत नाहीं.'' ( रमेशचंद्र दत्त.–' India in Victorian Age ', पा. ३५४.). ब्रिटिश भांडवल अशा महाग दरांत आणलें तें आणलेंच;

पण त्याबरोबरच ब्रिटिश भांडवलदारहि इकडे आले. त्यांनीं हिंदी हितसंबंधांकडे पूर्ण दुर्लक्ष करून स्वार्थी बुद्धीनें कंपन्यांचे व्यवहार हाताळले. मि. मॅसी यांनीं साक्ष देतांना म्हटलें आहे : " पैसा हुगळी नदींत जात आहे का त्यापासून कांहीं निर्मिति होत आहे, याची त्याला ( ब्रिटिश भांडवलदाराला ) मुळींच फिकीर नसे ! "–( श्री. तिवारी– 'Railways in Modern India' पृ. ५३.)– याशिवाय हिंदी राष्ट्रीय उद्योगधंद्यांच्या हितसंबंधांकडे पूर्ण दुर्लक्ष झालें. लॉर्ड डलहौसींचें हिंदी बाजारपेठा ब्रिटिश पक्क्या मालानें भरण्याचें स्वप्न साकार झालें. तसेंच, हिंदुस्थानांतून कापसासारखा कच्चा मालहि अधिकाधिक बाहेर जाऊं लागला.

या दोषांबरोबरच आणखीहि कांहीं गोष्टी आक्षेपार्ह होत्या : उदा. ब्रॉड गेज अत्यंत महाग असूनहि पत्करलें. कांहीं ठिकाणीं दुहेरी मार्ग कारण नसतांना बांधले. यांमध्यें आणखी १८५७ सालच्या बंडामुळें न भूतो न भविष्यति अशा निर्माण झालेल्या परिस्थितीची भर पडली. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, कंपन्यांना आपलें व्याजहि या धंद्यांत मिळालें नाहीं. त्यांनीं सरकारकडे व्याजाची मागणी केली. यामुळें सरकारला स्वतःच रेल्वे बांधण्याचें धाडस करावें असें वाटूं लागलें. लॉर्ड लारेन्स व लार्ड मेयो यांनींहि त्याचा जोराचा पुरस्कार केला. त्यास अनुसरून भारतमंत्र्यांनीं सरकारनें रेल्वे बांधण्याचा आपला महत्त्वाचा निर्णय जाहीर केला. " भारत सरकारनें आपल्या पतीच्या जोरावर जरूर तें भांडवल जमवून तें आपल्या इच्छेप्रमाणें योग्य त्या पद्धतीनें खर्च करण्यास योग्य अशी वेळ आली आहे " असें त्यांनीं हिंदुस्थान सरकारला कळविलें ( १५–७–१८६९ ). यानंतर सुमारें १० वर्षेंपर्यंत सरकारनें आपल्या स्वतःच्या हिंमतीवर भांडवल उभारून दरसाल सुमारें २ लक्ष पौंड खर्च करून सुमारें २००० मैल रेल्वे बांधली.

परन्तु सरकारच्या दुर्दैवानें १८७४–७९ हीं वर्षें फार जिकीरीचीं गेलीं आणि रेल्वेकरितां पैसा मिळणें अवघड झालें. एक तर सरहद्दीवरील मीटर गेज लष्करी कारणांसाठीं ब्रॉड गेज करावी लागली. त्यांत पैसा गेला. त्यांतच रुपयाचा भाव घसरला. त्यामुळें सरकारची आर्थिक जबाबदारी (–पौंडांतील ठराविक व्याजाला अधिक रुपये– ) वाढली. तसेंच, याच पांच वर्षांत अत्यंत उग्र असे दुष्काळ पडले. परन्तु दुष्काळाचा कहर कमी करण्याकरितांसुद्धां अधिक रेल्वे बांधणें भाग पडलें व सरकारनें खर्चाची क्षिति न बाळगतां तें तसेंच चालू ठेवलें. मात्र याचा परिणाम असा झाला कीं, दरसाल ३५ लाख पौंडांपेक्षां जास्त खर्च होऊनहि भागलें नाहीं. शेवटीं एक प्रकारें शरणागति पत्करून, सरकारला खासगी कंपन्यांना रेल्वे बांधण्यासाठीं पुन्हां पाचारण करावें लागलें. या कालखंडाच्या ( १८६९-१८७९ ) अखेरीस एकूण रेल्वे ८९९६ मैल झाली.

यानंतर भारतमंत्र्यांनीं एक ' सिलेक्ट कमिटी ' नेमून तिला रेल्वेवाढीच्या प्रश्नाची चौकशी करण्यास सांगितलें. तिनें सर्व प्रश्नांचा सखोल अभ्यास करून " सरकारनें व खासगी कंपन्यांनीं दोघांनींहि रेल्वे बांधाव्या " असा सल्ला दिला. या धोरणानुसार सरकारनें नवीन कंपन्यांशीं करार केले. त्यांत व्याजाची हमी देण्यांत आली होती. पण एकंदरीनें हे करार पूर्वींच्या करारांपेक्षां सरकारला बरेच अनुकूल होते. १० किंवा २५ वर्षांच्या अवधीनंतर करार रद्द करण्याचा किंवा त्यांत बदल करण्याचा अधिकार सरकारनें आपणांकडे राखून ठेवला. कंपन्यांच्या भांडवलावर एका ठराविक दरानें सामान्यतः ३$\frac{1}{2}$ % प्रमाणें व्याज देण्याची हमी देण्यांत आली. ( मागील करारांत हा दर ४॥ % ते ५ % होता. ) जादा नफ्याचा बराचसा भाग $\frac{3}{4}$ सरकारला मिळून बाकीचा कंपन्यांना मिळावा असें ठरलें. ( जठार आणि बेरी : ' Indian Economics '–Vol. II, पा. १८८ ).

१८८५–१९०० या कालांत सरकारनें स्वतः धडाडीचा कार्यक्रम सुरू केला. मात्र या कार्यक्रमाला सूत्रबद्धता अगर योजना नव्हती. भारतमंत्र्यांनीं खर्चावर नियंत्रण घालण्याचा प्रयत्न केला. पण या अवधींत एकूण सुमारें ७५ कोटी रुपये रेल्वेवर खर्चण्यांत आले. यांतील बराचसा भाग वायव्य सरहद्दीवरील लष्करी महत्त्वाच्या रेल्वे










अनुक्रमणिका

बांधण्याकडे व दुरुस्त करण्याकडे खर्च करण्यांत आला. हिंदुस्थान सरकारनें या लष्करी स्वरूपाच्या रेल्वेकरितां निराळें कर्ज उभारण्याची सूचना ब्रि. सरकारला केली होती. पण ती भारतमंत्र्यांनीं धुडकावून लावली. " लष्करी आणि राजकीय कारणांकरितांच केवळ हिंदुस्थानांत रेल्वे बांधण्यांत आल्या या आक्षेपाचें समर्थन करणारा हा पुरावाच होय " ( तिवारी, ' कित्ता ' पृ. ७१ ).

याच कालावधींत संस्थानी रेल्वे उदयाला आली. हैदराबाद संस्थानांत निझामानें हमी पद्धत स्वीकारली.

१९०० ते १९१४ च्या दरम्यान १०००० मैल लांबीचे रेल्वेचे फाटे बांधण्यांत आले. रेल्वेची एकूण लांबी ३४००० मैलांहून अधिक झाली व सर्व मुख्य फाटे बांधून झाले.

१९१४-१८ या पहिल्या महायुद्धाच्या काळांत रेल्वेची अगदीं दुर्दशा झाली. वाढ खुंटली, दुरुस्ती व बदल थांबले. मात्र लष्करी व मुलकी वाहतूक वाढली. एंजिनें खराब झालीं. डबे अपुरे पडले. रेल्वेसुधारणांबाबत देशांत एकच ओरड झाली. रेल्वे कंपन्यांच्या कारभारावर टीका होऊन सरकारनें स्वतः कारभार आपल्या हातीं घ्यावा, अशी एकमुखी मागणी करण्यांत आली. सरकारनें सर वुइल्यम ॲक्वर्थ यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमून तिला या प्रश्नाबाबत सल्ला देण्यास सांगितलें. ॲक्वर्थ कमिटीनें खासगी कंपन्यांच्या कारभारांतले तात्त्विक फायदे ( उदा०-व्यापारी तत्त्वावर चालविणें, राजकारणापासून अलिप्तता वगैरे ) मान्य करूनहि, हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीस अनुसरून रेल्वेंचा कारभार सरकारनेंच पाहावा या बाजूनें निर्णय दिला. याच्या बुडाशीं हिंदुस्थानांतील वाढतें राष्ट्रप्रेम, रेल्वेंत गुंतलेलें सरकारी भांडवल व दळणवळणांच्या साधनांत सरकारमार्फत एकवाक्यता निर्माण करण्याची शक्यता ह्या गोष्टी होत्या हें सांगणें नकोच. यानंतर, या निर्णयाबरहुकूम सरकारनें करारमुदत संपल्यानंतर रेल्वेकारभार आपल्याकडे घेण्याचें सुरू केलें.

येथें हें नमूद करावयास पाहिजे कीं, ब्रिटिश अंमलाखालीं असतांनाच भारत सरकारनें स्टर्लिंग कर्जाचें रुपयांत रूपान्तर करण्याचें धोरण स्वीकारलें होतें. त्यांतच दुसऱ्या महायुद्धामुळें ब्रिटनच आपलें देणेकरी राष्ट्र बनलें. त्या संधीचा फायदा घेऊन रेल्वेसाठीं काढलेलें सर्व कर्ज हिंदुस्थाननें स्टर्लिंग निधींतून देऊन टाकलें. अशा रीतीनें रेल्वेच्या राष्ट्रीयीकरणास दुसऱ्या महायुद्धामुळें गति मिळाली.

१९४७ सालीं हिंदुस्थान स्वतंत्र झाला. पण त्याबरोबरच पाकिस्तान निर्माण झालें आणि हिंदी रेल्वेंना अगदीं एका नवीन प्रश्नाला तोंड द्यावें लागलें. हिंदी रेल्वेंची रचना अखिलभारतीय पार्श्वभूमीवर झालेली होती. त्यांची आतां विभागणी करणें प्राप्त झालें. पाकिस्तानी प्रदेशांत असणारे रेल्वेमार्ग पाकिस्तानांत गेले व बाकीचे भारतांत राहिले. फक्त बेंगॉल-आसाम रेल्वे व नॉर्थ वेस्टर्न रेल्वे यांची विभागणी करावी लागली. अशा रीतीनें ६७४८ मैल रेल्वे पाकिस्तानकडे व २४५६५ मैल रेल्वे भारताकडे आली. एकूण भांडवलापैकीं ६७२ कोटी भांडवल हिंदुस्थानकडे व १३६ कोटी पाकिस्तानकडे गेलें. नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवरील मुगलपुरा वर्कशॉप पाकिस्तानला मिळालें व कचरापारा येथील वर्कशाप भारताला मिळालें. रूळ, एंजिनें, डबे यांची विभागणी लांबी आणि वाहतुकीच्या परस्परांतील प्रमाणांत झाली ( प्रा. सी. एन्. वकील, ' Economic Consequences of Partition ', 1949. p. 54-55 ).

### प्रदेशवार संघीकरण

अधिक व्यवहार्यतेच्या तत्त्वावर हिंदी रेल्वेंचे प्रदेशवार गट पाडून त्यांचें सूत्रीकरण वा संघीकरण करावें ह्या कल्पनेला ॲक्वर्थ कमिटी इत्यादी तज्ज्ञसमितींनीं पाठिंबा दिला होता. अशा सूत्रीकरणानें खर्चामध्यें बचत होऊन रेल्वेंची कार्यक्षमता वाढते, हें इंग्लंडमधील उदाहरणानें सिद्ध झालें आहे. १९५० सालीं रेल्वे बोर्डानें प्रदेशवार सूत्रीकरणाची एक योजना सुचविली होती. ती मुख्यतः तीन तत्त्वांवर आधारलेली होती : ( १ ) प्रत्येक गटाला स्वतःचा असा स्वतंत्र प्रदेश असावा. ( २ ) उच्च श्रेणींतील अधिकारी वर्ग नेमतां येऊन मुख्य कार्यालय कार्यक्षमतेनें चालूं शकेल








एवढी तरी प्रत्येक गटाची व्याप्ति असावी. ( ३ ) पुनर्वर्गीकरण करतांना चालू व्यवस्थेंत शक्य तितका कमी बिघाड व्हावा.—या तत्त्वानुसार पुढीलप्रमाणें भारतीय रेल्वेंचें संघीकरण झालें आहे. स्वातंत्र्य व संस्थानांचें विलीनीकरण यांमुळें हा प्रश्न पुष्कळच सुकर झाला. एकूण सहा प्रादेशिक संघ कल्पिले आहेत : ( १ ) सदर्न ( एम्. एस्. एम्., एस. आय. आर. आणि म्हैसूर ), ( २ ) सेंट्रल ( जी. आय. पी., निझाम, सिंद्या आणि धोलपूर ), ( ३ ) वेस्टर्न ( बी. बी. सी. आय, सौराष्ट्र, राजपुताना व जयपूर ), ( ४ ) नॉर्दर्न ( जोधपूर, बिकानेर, ई. पी., ई. आय. व बी. बी. सी. आय. चा कांहीं भाग ). ( ५ ) नॉर्थ ईस्टर्न ( औध तिऱ्हूट, आसाम, व ई. आय. चा कांहीं भाग ) ( ६ ) ईस्टर्न ( बी. एन. आर., ई. आय्. चा कांहीं भाग. )

प्रादेशिक सूत्रीकरण सुरळितपणें चाललें असून कार्यक्षमता हळूहळू वाढत असल्याचें श्री. लाल बहादुर शास्त्री यांनीं नुकतेंच पार्लमेंटमध्यें सांगितलें.

## रेल्वेची अर्थव्यवस्था

१९२४ सालीं ॲक्वर्थ कमिटीच्या शिफारसींनुसार रेल्वेंचें अंदाजपत्रक मुख्य अंदाजपत्रकापासून वेगळें करण्यांत आलें. याचें मुख्य कारण म्हणजे रेल्वेंचें उत्पन्न कांहीं असो, इतर खात्यांना पैसा लागला तर तो तिकडे घेऊन रेल्वेची वाढ व सुधारणा रद्द व्हावयाच्या. शिवाय रेल्वेचा व्याप खूपच वाढला होता. रेल्वेंना फायदा म्हणजे सरकारची भरभराट व रेल्वेला तोटा म्हणजे सरकारी खर्चाची तारांबळ असें होऊं नये म्हणून हीं दोन्हीं अंदाजपत्रकें वेगळीं करावीं, असें कमिटीनें सुचविलें व त्याप्रमाणें तीं वेगळीं केलीं गेलीं. त्या वेळेला सरकारनें रेल्वे... कांहीं अटी लादल्या : त्यांतील मुख्य म्हणजे रेल्वेनें आपल्या भांडवलावर शें. १ टक्का इतकी रक्कम दरवर्षी सरकारला खंडणी म्हणून द्यावी; शिवाय त्या वर्षी झालेल्या जादा नफ्याचा ⅕ भाग सरकारला दिला पाहिजे; एक रिझर्वफंड व घसारानिधि निर्माण करण्यांत येऊन त्याकरितां सालोसाल वेगळी रक्कम काढून ठेवण्यांत यावी; या निधीवर सरकारचा अग्रहक्क राहून त्यांतून खंडणीच्या रकमेची जरूर पडल्यास भरपाई करण्यांत यावी.

वरील १९२४ च्या व्यवस्थेनें भारत-सरकारच्या उत्पन्नाला स्थैर्य येईल अशी अपेक्षा होती. पण ती फोल ठरल्यानें घटनासमितीनें एक निराळी व्यवस्था स्वीकारली. तिचा अम्मल १ एप्रिल १९५० पासून सुरू झाला आहे. तिचें स्थूल स्वरूप असें : ( १ ) १ एप्रिल १९५० पासून पुढील ५ वर्षांत रेल्वेंनीं बिनलष्करी फांट्यांत गुंतलेल्या भांडवलावर शेंकडा ४ टक्के डिव्हिडंड सरकारला दिलें पाहिजे. ( २ ) दरसाल कमींत कमी १५ कोटी रु. घसाराफंडाकरितां राखून ठेवले पाहिजेत. ( ३ ) 'रेल्वेविकास-फंड' नांवाचा निधि उभारून त्यांतून प्रवाश्यांच्या सुखसोयी, मजुरांचें सौख्य यांविषयीं योजना आणि आवश्यक पण बिनउत्पन्नाच्या अशा रेल्वेयोजना पार पाडल्या पाहिजेत.

गेल्या पांच वर्षांत रेल्वेनें सरकारी तिजोरींत सुमारें १४० कोटींची भर घातली आहे. १९५१–५२ मध्यें रेल्वेनें उत्पन्नाचा उच्चांक ( २९०·२२ कोटी रु. ) गांठला.

## रेल्वे व पंचवार्षिक योजना

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत रेल्वेपुढें सामग्रीचा तुटवडा व वाहतुकीची बेसुमार वाढ हे दोन महत्त्वाचे प्रश्न होते. या दोन गोष्टींमुळें रेल्वेंची कार्यक्षमता कमी झाली. १९५० मध्यें उपलब्ध असलेल्या एंजिनांपैकीं सुमारें ⅓ एंजिनें व उतारूंच्या व मालाच्या गाड्यांपैकीं जवळजवळ ¼ इतक्या गाड्या टाकाऊ झाल्या होत्या. ... मार्ग जीर्ण झाले होते. ते बदलणें अत्या... होतें. उलट पक्षीं, १९३८-३९ च्या मा... वाहतूक मात्र २॥ पटींनीं वाढली होती ! यामु... पंचवार्षिक योजनेचा मुख्य उद्देश ही दुर्दशा नाहींशी करून रेल्वेची नीट घडी बसविणें हाच असला तर नवल नाहीं. पण जवळ असलेल्या पैशांत विशेष नेत्रदीपक स्वरूपाची वाढ होईल असें अपेक्षिणेंच चूक आहे. तेव्हां पुरेशीं एंजिनें वाढविणें, उतारूगाड्या व मालडब्यांची संख्या

वाढविणें, अधिक गाड्या सोडणें, गाड्यांचे वेग वाढविणें, तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या,—डब्यांतील व स्टेशनांतील सुखसोयी वाढविणें, रेल्वे-कामगारांना अधिक बरीं घरें बांधून देणें, काढलेले लोहमार्ग पुन्हां टाकणें व अगदीं अत्यावश्यक अशा राष्ट्रीय स्वरूपाचा एखादा नवा मार्ग घालणें—या मर्यादित कार्यक्रमाकडेच पंचवार्षिक योजनेंत रेल्वेकरितां मंजूर झालेले ४०० कोटी रुपये खर्च होतील. पंचवार्षिक योजनेच्या अधिकृत रूपरेषेंत स्पष्ट म्हटलें आहे : "रेल्वेविकासाचे नेत्रदीपक संकल्प योजनेच्या पुढील टप्प्यापर्यंत थोपवून धरणें भाग आहे." ('The Five-Year Plan': Draft Outline, July 1951, p. 171)

या मर्यादित उद्दिष्टांच्या अनुरोधानेंच रेल्वे-मंत्री श्री. लालबहादुर शास्त्री यांनीं १९५३–५४ चें अंदाजपत्रक तयार केलें आहे. दीसा-गांधीधाम हा वेस्टर्न रेल्वेचा फांटा, बिजनोर–चांदपूर–सिआव हा नॉर्दर्न रेल्वेचा फांटा व क्विलॉन-एरनाकुलम् हा सदर्न रेल्वेचा फाटा हे पूर्ण होऊन वहातुकीला चालू सालीं खुले झाले आहेत. वेस्टर्न रेल्वेवरील वासद-कठाना मार्ग चालू सालीं पुरा होईल. शिवाय कल्याण पॉवर हाऊसवर ३ कोट रु. खर्च झाला असून तें पूर्ण झालें आहे. पेराम्बूर येथील उतारू-डबे तयार करण्याचा कारखाना बांधणें चालू असून त्यावर या वर्षी १·३ कोटी रु. खर्च व्हावयाचे आहेत. १९५३–५४ सालीं एकूण ८० कोट रु. भांडवली खर्च व्हावयाचा असून, कांहीं नवे फांटे हातीं घेण्यांत येणार आहेत. याखेरीज १ कोटी ८९ लक्ष रुपये खर्च करून चालू वर्षी स्थितील लाईट रेल्वे विकत घेण्यांत येणार आहे. श्री. शास्त्री यांनीं समाधानपूर्वक सांगितलें कीं, "आपण उतारू-डबे, मालडबे आणि रूळ यांच्या निर्मितीच्या बाबतींत स्वयंपूर्ण झालों आहोंत." चित्तरंजनच्या एंजिनांच्या कारखान्याची बरीच प्रगति झाली असून, तेथें एंजिनांना लागणारे ७० टक्के सुटे भाग तयार होतात. हा कारखाना आणि टाटांचा कारखाना मिळून यामुळें लवकरच हिंदुस्थान एंजिनांबाबत स्वयंपूर्ण होईल. हिंदुस्थानांत चालू सालीं लागणाऱ्या ११००० मालडब्यांपैकीं ७००० कलकत्त्याला तयार होतील. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे हाल कमी करण्याचें मंत्र्यांनीं आश्वासन दिलें

### भारतीय रेल्वेचें आजचें स्वरूप

भारतीय रेल्वेची एकूण लांबी ३४०२२ मैल असून त्यांपैकीं २३६ मैल विजेच्या गाड्यांचे आहेत. एकूण स्टेशनें ७२००० आहेत. प्रवासी वाहतुकीचें 'एअर-कंडिशण्ड' धरून ५ वर्ग आहेत. नॅरो गेजसह गेजचे ४ प्रकार आहेत. १९४९-५० सालीं रेल्वेजवळ ८४३७ एंजिनें, १५३५८ प्रवासी डबे व २०१७१४ मालडबे होते. त्या वर्षी रेल्वेवरून १,२५,४५,४०,००० लोकांनीं प्रवास केला. नोकरलोकांची संख्या ८, १४, ८०५ असून त्यांच्या पगाराची रक्कम १००,५०, १८, ४०२ रु. इतकी भरते!

भारतीय रेल्वेचा क्रमांक अखिल जगांत चौथा लागतो. पण नुसत्या मैलांच्या संख्येनें रेल्वेच्या प्रगतीची कल्पना येणार नाहीं. त्याकरितां क्षेत्रफळाशीं एकंदर रेल्वे मैलांचें इतर देशांशीं काय प्रमाण पडतें तें पाहिलें पाहिजे. त्या दृष्टीनें पुढील आंकडे उद्बोधक आहेत (Dewett & Singh—'Indian Economics', पा. ३२४.):

**प्रत्येक १०० चौ. मै. क्षेत्रास रेल्वे मैलांचें प्रमाण**

| | |
|---|---|
| अमेरिका ... ... ... | ६·६ |
| कॅनडा ... ... ... | १·० |
| दक्षिण आफ्रिका ... ... | २·४ |
| अर्जेंटिना ... ... ... | २·६ |
| युरोपमधील रशिया ... ... | १·५ |
| बेल्जिअम् ... ... ... | ४०·० |
| ग्रेट ब्रिटन ... ... ... | २०·० |
| भारत ... ... ... | २·८ |

**प्रत्येक १ लाख लोकसंख्येस रेल्वे मैलांचें प्रमाण**

| | |
|---|---|
| अमेरिका ... ... ... | २२४ |
| कानडा ... ... ... | ४६५ |
| दक्षिण आफ्रिका ... ... | १६४ |
| ग्रेट ब्रिटन ... ... ... | ४६ |
| भारत ... ... ... | १०·७ |








यावरून पाहतां क्षेत्रफळाच्या दृष्टीनें, जगांतील प्रामुख्यानें कृषिप्रधान असलेल्या देशांबरोबर हिंदुस्थानची रेल्वेच्या बाबतींत तुलना होऊं शकेल. मात्र बेल्जिअम् किंवा इंग्लंडसारख्या उद्योग-प्रधान राष्ट्रांत क्षेत्रफळाच्या मानानें रेल्वेची लांबी बरीच आहे. मात्र लोकसंख्येच्या मानानें भारताची तुलना जर याच राष्ट्रांशीं केली तर आपण किती मागें आहोंत हें समजून येईल. त्यामुळें हल्लींचे ३४००० मैलसुद्धां फार कमी आहेत. मॅके कमिटीनें मागेंच सांगितलें होतें कीं, हिंदुस्थानला एक लाख मैल रेल्वेसुद्धां अपुरीच पडेल. एक मैलांचा प्रश्न सोडून दिला, तरी इतर बाबतींत आपण कोठें आहोंत ? सुखसोयी, गाड्यांचे वेग, प्रवासी गाड्या या बाबतींत आपण आशियाबाहेरील आपल्याएवढ्या एखाद्या दुसऱ्या देशाशीं बरोबरी करूं शकूं काय ? आपणांला आपल्या रेल्वेंचा अभिमान वाटेल अशी परिस्थिति येण्यास अद्याप अवकाश आहे. हें उद्यांचें स्वप्न आहे. तें पुढच्या पंचवार्षिक योजनेंत तरी साकार होईल अशी आपण आशा बाळगूं या.

---

# सार संकलन

## चांदिलचें सर्वोदय संमेलन

गेल्या ता. ७–८ मार्चला बिहारमधील मानभूम जिल्ह्यांतील चांदिल या गांवीं, जेथें आचार्य विनोबा आजारीपणांतून उठल्यानंतर वास्तव्य करीत होते, सर्वोदयसंमेलन भरलें होतें. या संमेलनाला सुमारें २ हजार कार्यकर्ते उपस्थित होते. राष्ट्राध्यक्ष श्री. राजेंद्रप्रसाद यांनीं संमेलनाचें उद्‌घाटन केलें. श्री. जयप्रकाश नारायण संमेलनाला हजर होते. या संमेलनासंबंधीं सविस्तर वृत्तांत 'भूदान-यज्ञ' (पुणें) या साप्ताहिकाच्या १२, १९ व २६ मार्च अशा अनुक्रमें तीन अंकांतून आला आहे. त्यांतून पुढील वृत्तान्त संकलित केला आहे :

आतांपर्यंत प्रांतोंप्रांतीं भूदान जें मिळालें आहे, त्याचे आंकडे पुढीलप्रमाणें आहेत :

बिहार—१ लाख २७ हजार एकर (पैकीं गया जिल्ह्यांत ३२ हजार एकर); हिमाचल-प्रदेश—१००० एकरांवर; महाराष्ट्र—४९७६ एकर; तामीलनाड—६४५२ एकर; केरळ—६०,००० एकर; उत्तर प्रदेश—४,७४०२९ एकर; मध्य प्रदेश—१४५०० एकर; मध्यभारत—६०७१ एकर; विन्ध्य प्रदेश—२०७२ एकर; सौराष्ट्र—२५०० एकर; हैदराबाद—४२००० एकर; पंजाब—१५००.

सर्व-सेवा-संघाचे मंत्री श्री. शंकरराव देव यांनीं अहवाल देतांना सांगितलें : "आतांपर्यंत (११ महिन्यांत) साधारणपणें सहा-सात लाख एकर जमीन मिळाली आहे. २५ लाखांचा संकल्प पुढच्या एका वर्षांत पुरा करावयाचा म्हणजे आणखी १८-१९ लाख एकर जमीन मिळवायची आहे. या कामीं रचनात्मक कार्यकर्त्यांबरोबरच काँग्रेस व प्रजा-समाजवादी या दोन राजकीय पक्षांच्या कार्यकर्त्यांनीं सहकार्य केलें आहे. कम्युनिस्टांनीं त्याला विरोध दर्शविला आहे. संस्था या नात्यानें काँग्रेसनें किंवा प्र. स. पक्षानें हें काम आपलें म्हणून अजून उचललेलें नाहीं. त्या त्या पक्षांतील व्यक्ती या कामीं लागलेल्या आहेत हें खरें. विदर्भ काँग्रेसच्या अनुयायांनीं व्यक्तिगत नात्यानेंहि या कामाला मदत दिलेली नाहीं. जमीन देणाऱ्यांत मोठ्या जमीनींचे मालक आणि छोट्या जमीनींचे मालक दोन्ही आहेत ही गोष्ट खरी; पण छोट्या जमिनींचे मालकच जास्त आहेत. पण त्यांना वाटतें कीं, आपल्या अशा लहान लहान तुकड्यांनीं काय होणार ?–मोठ्या मालकांना कायद्याची इच्छा आहे. अर्थात् तेहि समजून चुकले आहेत कीं, आतां जमीन कांहीं आपल्याकडे राहणार नाहीं."

चांदिल संमेलनांत तीन ठराव मंजूर झाले. एक भूदान-यज्ञासंबंधीं. भूदान यज्ञ हा अहिंसक








क्रान्तीचा एक टप्पा आणि सर्वोदयसमाजाची आधारशिला आहे असें ठरावांत म्हटलें असून, शोषणरहित आणि समतायुक्त समाज स्थापन करण्याच्या दृष्टीनें एक महत्त्वाचा टप्पा म्हणून पुढील १२ महिन्यांत २५ लाख एकर व १९५७ पूर्वी ५ कोटी एकर इतकी जमीन मिळविण्याच्या कामीं सहकार्य देण्यासाठीं सर्व राजकीय व सामाजिक कार्यकर्त्यांना व क्रान्तीकरितां अधीर झालेल्या तरुणांना ठरावांत आवाहन केलें आहे. **दुसरा ठराव ग्रामोद्योगासंबंधीं** आहे. जीवनाच्या प्राथमिक गरजा ( अन्न, वस्त्र, निवास, आरोग्य व शिक्षण ) यांच्या बाबतींत गांव स्वयंपूर्ण व्हावें, गांवच्या लोकांनीं स्वतःच्या बळावर राजकीय आणि आर्थिक सत्तेचें विकेन्द्रीकरण करून ग्रामराज्याची स्थापना करण्यास समर्थ व्हावें, असें या ठरावाचें उद्दिष्ट असून, एक मूलभूत प्रारंभ म्हणून अन्न आणि वस्त्र या स्वावलंबनास बाधक होणाऱ्या केंद्रित उद्योगांवर बहिष्कार टाकला जावा, अशी मागणी ठरावांत केली आहे. **तिसरा ठराव दारूबंदीसंबंधीं** असून त्यांत दारूबंदी करणाऱ्या मुंबई व मद्रास सरकारांचें अभिनंदन केलें असून, दारूबंदीच्या बाबतींत 'मंद गतीनें चाला' असें म्हणणाऱ्या कांहीं केंद्रीय मंत्र्यांच्या वृत्तीचा निषेध केला आहे.

संमेलनांत आचार्य विनोबांचीं अत्यंत महत्त्वाचीं भाषणें झालीं. त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे :

" आपण जगाच्या कुठल्याहि कोपऱ्यांत असलों तरी आज जगाची अशी परिस्थिति नाहीं कीं, चाललेल्या घडामोडींवर नजर न टाकतां आपलें काम होऊं शकेल. कल्पनांचा, विचारांचा आणि भावनांचा जो संस्पर्श आणि संघर्ष सुरू आहे त्यांवर सतत दृष्टि ठेवूनच पाऊल टाकलें पाहिजे.

" आपले महान् नेते पं. नेहरू यांनीं अनेक वेळां बोलून दाखविलें आहे कीं, जगाचे कोणतेहि प्रश्न शस्त्रबलानें सुटूं शकत नाहींत. ते अहिंसा अंतःकरणानें मानतात. हृदयानें त्यांचा तीव्र विश्वास आहे. तरीहि सैन्य ठेवणें, तें वाढविणें आवश्यक आहे, अशी जबाबदारी त्यांना मानावी लागते. अशा प्रकारच्या विचित्र परिस्थितींत आपण आहोंत. श्रद्धा आपली एका गोष्टीवर आहे असा आभास होतो आणि कृति मात्र दुसरी करावी लागते. हृदयाची आणि बुद्धीची रस्सीखेच चालते.

" जे आज सत्तेच्या स्थानावर आहेत त्यांच्या जागीं आम्हांला बसविलें तर, आम्हीहि तसेंच करणार नाहीं असें सांगतां येणार नाहीं. ही त्या खुर्चीची जादू आहे. तेथें एक प्रकारच्या अस्वाधीन अशा मर्यादेंत विचार करावा लागतो. त्याच्याविरुद्ध दिशेनें नाइलाजानें जाणें भाग पडतें. सैन्यबळावर आधार ठेवल्या-वांचून आमचें चालणार कसें असें आम्हांला वाटतें. आणि मग आम्हांला कोणी ढोंगी, दांभिक म्हटलें तरी आम्हांला कांहीं उत्तर देणें शक्य राहत नाहीं. मात्र नाइलाजानें असें होतें. ही आमची दांभिकता नव्हे, दयाजनक स्थिति आहे !

" लोक विचारतात, तुम्ही स्वतः सरकारची जबाबदारी कां उचलीत नाहीं ? जेथें गाडीला दोन बैल जुंपले आहेत आणि गाडी चालली आहे तेथें मी तिसरा बैलच म्हणून बनून गेलों तर गाडीला माझी काय मदत होणार ? बैलाला संस्कृतांत फार मोठें नांव आहे. त्याला 'धुरंधर' म्हणतात : जो धुरा वाहतो तो. तसा धुरंधर मला बनायचें नाहीं. गाडीला चांगला रस्ता जर मी दाखवूं शकलों तर संभव आहे कीं, गाडीला नीट घेऊन जातां येईल. हें काम आपलें आहे. स्फूर्ति देतां आली तर द्या असें आम्हांला सांगितलें जातें. आणि या दृष्टीनें **स्वतंत्र लोकशक्तीची** दृष्टि निर्माण करण्याच्या कामीं आपणांला लागलें पाहिजे. 'स्वतंत्र लोकशक्ति' म्हणजे जी शक्ति हिंसाशक्तीला विरोधी पण दंडशक्तीहूनहि भिन्न आहे अशी शक्ति. दंडशक्तींत हिंसेचा अंश अवश्य आहे. तरीसुद्धां तिला आम्ही हिंसाशक्ति म्हणूं इच्छीत नाहीं. कारण ती लोकांनीं सोंपविलेली असते. पण ही दंडशक्तीसुद्धां उपयोगांत आणावी लागूं नये असें काम आपल्याला केलें पाहिजे. तरच आम्हीं स्वधर्म ओळखला असें म्हणतां येईल. नाहीं तर आम्हीं आमच्याविषयींची अपेक्षा पूर्ण केली, असें होणार नाहीं. किंबहुना आपण भाररूप होऊं. दंडशक्तीच्या आधारावर सेवेचीं कार्यें होऊं












शकतात आणि त्यासाठींच आम्ही ' राज्यशासन ' असें म्हणतों. तशा शासनाची आवश्यकताहि आहे. त्यांतून सेवा निर्माण होऊं शकेल. पण ती शुद्ध सेवा नव्हे. ज्यामुळें दंडशक्तीचा उपयोग आपल्याला करावा लागणार नाहीं अशी सेवा त्यांतून होणार नाहीं. उदाहरण देतों : युद्धामध्यें जखमी शिपायांची शुश्रूषा करण्यासाठीं एक सेवा-सेना असते. ती शत्रु-मित्र न पाहतां सेवा करते. दयायुक्त असें हें काम आहे. त्याची जरूरीहि आहे. परंतु युद्ध थांबविण्याचें काम ही सेवा करूं शकत नाहीं. त्यांची दया ही युद्ध मान्य करणाऱ्या समाजाचें एक अंग असतें. एका यंत्राचीं जशीं लहान-मोठीं चक्रें असतात–मग तीं एकमेकांविरुद्ध चालणारीं असलीं तरी–तीं जशीं सर्व एकाच यंत्राचीं अंगें असतात, तसें हें कामसुद्धां युद्धयंत्राचें एक अंगच असतें. हत्या करणारी सेना आणि शुश्रूषा करणारी सेना मिळून युद्ध बनतें. या सेनेनें हिंसेंत लज्जत उत्पन्न होते. हिंसेच्या अधीन ही दया असते. अशा रीतीनें निर्दयतेच्या शासनाखालीं राहून चालणाऱ्या दयेच्या स्वरूपाचें काम केलें तर आमचें म्हणून असणारें कार्य आम्हीं केलें असें होणार नाहीं.

" जनशक्ति ही दंडशक्तीला विरोधी नाहीं, हिंसाशक्तीला विरोधी आहे. दंडशक्तीनें शक्ति उत्पन्न होत नाहीं असें नाहीं; पण ती शिवशक्ति असत नाहीं. म्हणून विचाराचा निरंतर प्रचार करणें हें आमचें काम आहे. पण तें आम्ही करीत नाहीं, केलें पाहिजे. बुद्धभगवान् आणि शंकराचार्य यांनीं भिक्षुसंघ आणि यतिसंघ कां बनविले याचें रहस्य समजतें. अखंड वाहणाऱ्या झऱ्याप्रमाणें आपण सतत लोकांना विचार पोहोंचवीत असलें पाहिजे. एकदां सांगितलेला विचार समजला नाहीं आणि दुसऱ्यांदां तो सांगावा लागला तर दुसऱ्यांदां सांगण्याची संधि मिळाल्याचा आनंद वाटला पाहिजे. इतकी विचारावर श्रद्धा आणि विचारप्रचारावर निष्ठा असली पाहिजे.

" दुसरी गोष्ट कर्तृत्वविभाजनाची. त्याचा अर्थ हा कीं, सर्व कर्तृत्वशक्ति एका केंद्राकडे असूं नये. खेड्यांतील लोकांत कर्मसत्ता निर्माण झाली पाहिजे. त्यासाठीं गांवांत कोणती वस्तु यावी, कोणती येऊं नये याचा निर्णय गांवानेंच केला पाहिजे. गांवांत गिरणीचें तेल येऊं नये असें गांववाल्यांना वाटलें तर तें येतां कामा नये असें झालें पाहिजे. असें सत्तेचें विभाजन केलें नाहीं, तर सेनाबल अनिवार्य आहे. सेनाबलापासून सुटका पाहिजे असेल तर परमेश्वरानें जसें अकलेचें वांटप केलें आहे आणि तो स्वस्थ झाला आहे––इतका कीं परमेश्वर आहे कीं नाहीं अशी शंका येते–त्याप्रमाणें सत्तेचें इतकें विभाजन झालें पाहिजे कीं, राजसत्ता आहे कीं नाहीं अशी शंका आली पाहिजे. म्हणून आम्ही ग्रामराज्याचा जयघोष करतों. नियंत्रणाची सत्ता ग्रामवासीयांनीं हातीं घ्यावी. आणि सरकारनें जर हें मानलें नाहीं तर त्या सरकारला विरोध करण्याकरितां उभें राहण्याची शक्ति त्यांच्यांत आली पाहिजे. तरच सैन्यबळापासून मुक्त होण्याची शक्ति आपल्यांत येऊं शकेल. त्यासाठीं नॅशनल प्लॅनिंग नव्हे, तर व्हिलेज प्लॅनिंग झालें पाहिजे. असें कर्तृत्वविभाजन होण्यासाठीं जमिनीचें अगोदर वांटप झालें पाहिजे असें आम्ही म्हणतों. "

श्री. जयप्रकाश नारायण यांचेंहि भाषण अत्यंत कळकळीचें आणि महत्त्वपूर्ण झालें. स्वराज्याच्या स्थापनेनंतर नवसमाज निर्माण करूं इच्छिणाऱ्या आपल्यासारख्या कार्यकर्त्यांच्या अंतःकरणांत निराशेनें घर केलें असतां, देशांत अंधार पसरत चालला असतां, एकाएकीं विनोबांच्या यज्ञाचा प्रकाश आपल्याला कसा दिसला याचें मनमोकळेपणानें वर्णन करून श्री. जयप्रकाश म्हणाले :

" धरती सर्वांची माता आहे आणि सर्वांना तिचा भाग मिळाला पाहिजे, जो उत्पन्न करतो त्याची तिच्यावर मालकी असली पाहिजे, अशी मानसिक क्रान्ति आज झाली आहे. ही क्रांति आतां प्रत्यक्षांत आणायची आहे. आमचे साथी पुष्कळ प्रश्न आजसुद्धां विचारीत आहेत. ते कायद्याचा प्रश्न आमच्यापुढें ठेवतात. विधायक कार्यकर्त्यांपुढें हा प्रश्न कदाचित् आला नसेल, पण आमच्यासारख्या राजकीय कार्यकर्त्यांपुढें वरचेवर हा कायद्याचा प्रश्न येत असतो. पण आज

विनोबाजींनीं सांगितलें कीं, ज्यांच्यापाशीं सत्ता आहे ते सत्तेनें हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करतील, पण आम्हां कार्यकर्त्यांचें काम राज्यसत्तेचा आधार न शोधतां जनशक्ति निर्माण करणें हें असलें पाहिजे. गया जिल्ह्यानें जर ३ लाख एकर जमीन यज्ञाच्या मार्गानें मिळविली तर गया जिल्ह्यांत कायदा करण्याची आवश्यकताच उरत नाहीं आणि या जिल्ह्यांत जर तसें होऊं शकलें, तर देशाच्या इतरहि जिल्ह्यांत तसें होऊं शकेल. हें काम कायद्याच्या आधाराशिवाय आपण पूर्ण करूं शकतों अशी आशा आमच्या अंतःकरणाला वाटूं लागली आहे. सेवापुरीचा २५ लाखांचा संकल्प पुरा करण्याचा विचार आपण येथें करीत आहों. पण तोच संकल्प दिवसगतीनें वाढत गेला आहे आणि बिहारमध्यें विनोबांनीं ३२ लाख एकर जमा करण्याचा संकल्प केला आहे. मलाहि वाटतें कीं, आपण सर्वांनीं कंबर कसली तर १९५७ पूर्वीं कायद्याची मदत न घेतां ५ कोटी एकर जमीन गोळा करणें अशक्य नाहीं.

" गया जिल्ह्यांत मला असा अनुभव आला कीं, आम्ही जातांच अमीर लोक लपून बसत, पुढें आलेच तर जितकें दान त्यांनीं द्यायला पाहिजे त्याहून फार थोडें देत. पण गरीब लोक मात्र मनमोकळेपणें देत. अशा रीतीनें कोट्यवधि गरीब जर मनसोक्त देतील तर श्रीमंतांनाहि द्यावें लागेल. श्रीमंतांवर गरीबांच्या दानाचा प्रभाव पडतो हेंहि आम्हांला दिसत आहे. न पडला तर जमीन घेऊन कांहीं ते गांव सोडणार नाहींत. त्यांना जमीन द्यावीच लागेल. गरीबांमध्यें अशी एक चेतना उत्पन्न करा कीं, ज्यायोगें ते आपल्या शोषणांत श्रीमंतांशीं सहकार करणार नाहींत. आजहि 'जमिनीवर आपला अधिकार आहे, ती आमच्याकडून हिरावून घेतली गेली आहे, ती आम्हीं त्यांच्याकरितां कां कसावी' अशी त्यांची भावना झाली आहे. ती हिंसक भावना नाहीं. गरीब आपल्या हक्काकरितां शांतिपूर्वक असहकार करील तर तो अहिंसक आहे असें मानावें लागेल. माझें माझ्या समाजवादी मित्रांना सांगणें आहे कीं, आम्ही गरीबांकडून दान घेतों त्यानें जनशक्ति उत्पन्न करतों. या जनशक्तीपुढें अन्याय उभा राहूं शकणार नाहीं.

" कायद्याची गोष्ट राजकीय कार्यकर्त्यांपुढें येते तेव्हां जास्तींत जास्त जमीन ( Ceiling ) प्रत्येकाकडे किती ठेवावी हा प्रश्न येतो. आम्हीसुद्धां असाच कांहींसा विचार करीत होतों. एखाद्याला वाटलें तर २५-३० एकर त्यानें आपल्याकरितां ठेवून घ्यावी, पण बाकीची जमीन तरी त्यानें वांटून दिली पाहिजे, असें आम्हांला वाटत होतें. पण ही चुकीची पद्धति आहे. गांवामध्यें जितके भूहीन आहेत त्या सर्वांना आज जमीन मिळवून द्यावयाची आहे हें खरें; तरी पण जमिनीचा एक नवीनच असा नकाशा आम्ही बनवीत आहोंत कीं, ज्यांत जमिनीचा मालक एक न राहतां सबंध गांव मालक होईल. सहकारी शेतीकडे आम्हांला जायचें आहे. आज जरी आम्ही लहानलहान मालक बनवीत असलों तरी पुढें ज्याला ' ग्रामीकरण ' म्हणतात तें आम्हांला अंमलांत आणायचें आहे. पण आज जमिनीची भूक आहे ती आम्हांला पुरवायची आहे. ही एक क्रांति पूर्ण केल्यानंतर त्यांतूनच दुसरी निर्माण होणार आहे. मी या यज्ञाकडे भूदान-यज्ञाच्या रूपानें पाहात नाहीं. ही सर्वांगीण आर्थिक, सामाजिक, राजकीय क्रांति चालू झाली आहे. तिचा उद्घोष म्हणजे हा भूदान-यज्ञ आहे. त्या क्रांतीचा हा पाया असें मी समजतों. म्हणून हें काम, तें काम, अशीं अनेक कामें जीं आपण हातांत घेतलीं असतील तीं सर्व सोडून देऊन याच कामाकडे लागण्याचा प्रयत्न करूं या. रशियांत १९१७ सालीं जशी क्रांति झाली तशी क्रांति या आपल्या देशांत चालू झाली आहे. आपण जर ती पाहिली नाहीं तर परमेश्वर समोरून जात असतांनासुद्धां त्याला न पाहिल्यासारखें हें दुर्दैव होईल ! म्हणून तरुणांनीं दीर्घ मुदतीच्या सुटींत हें काम करावें असें मी म्हणेनच; पण माझें त्यांना सांगणें आहे कीं, त्यांनीं एक वर्षपर्यंत शाळा-कॉलेज सोडून या कामाला वाहून घ्यावें. "

## जिब्रानचें सौंदर्यदर्शन

प्रसिद्ध महाकवि खलील जिब्रान याच्या ' Earth Gods ' (-याचाच उर्दू अनुवाद ' अरज़ी देवता '-' भू-देव ' या नांवानें सैयद वशीर हिंदी यांनीं केलेला आहे- ) या गद्यकाव्याचा

मराठी अनुवाद श्री. श्रीपाद जोशी यांनीं केला असून, तो 'हिरे आणि हिरकण्या' या नांवानें नुकताच प्रसिद्ध झाला आहे (प्रकाशक : सुलभ-राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें, मार्च १९५३. किं. १॥ रुपया). या पुस्तकास आचार्य स. ज. भागवत यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें उद्धृत केला आहे :

"खलील जिब्रान हा एक थोर कलावंत आहे. त्यानें चित्रकला आणि ललित साहित्य यांची आपल्या आयुष्यांत अखंड समांतर उपासना चालविली होती. या दोन्ही कलाप्रकारांतून त्यानें आपल्याला प्रतीत झालेलें जीवनदर्शन व्यक्त केलें आहे....कांहीं कलावंत असे आढळून येतात कीं, ज्यांच्या कला-जीवनांत विसंवाद अथवा विरोध मुळींच आढळत नाहीं. त्यांचें जीवनदर्शन कधीं खंडित होत नाहीं. तें अधिकाधिक रमणीय आणि परिणामकारक बनत जातें. खलील जिब्रान हा अखंडदर्शी कलावंत आहे. त्याच्या प्रारंभींच्या कलाकृतींत जीवनाचें जें दर्शन परिस्फुटित झालेलें आहे तेंच अखेरपर्यंत स्फुरत राहिलेलें आढळतें. त्याच्या एकंदर कला-जीवनांत निश्चित असें एकच जीवनदर्शन भरून राहिलेलें आहे. याचें कारण खलील जिब्रान जीवनाचा आध्यात्मिक साक्षात्कारावर पोसलेला एक कलावंत होता, हेंच होय.

"आध्यात्मिक जीवनदृष्टि आणि रूढ धार्मिकता या दोहोंमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. रूढ धर्म मनुष्याचा अहंकार वाढवितात, त्याच्या भावनांना संकुचित बनवितात आणि त्याच्या बुद्धीला भेद पाडावयास शिकवितात. कलावंताची प्रतिभा जेव्हां रूढ धर्मांचा उच्छेद करून विश्वाला गवसणी घालण्याइतकी विशाल बनते, त्या वेळीं तिला विश्वजीवनाच्या अनंततत्वाची साक्षात् प्रतीति येते. हेंच जीवनाचें आध्यात्मिक दर्शन होय. अशी थोर प्रतिभा ज्या कलावंताच्या वांट्याला आली असेल तो जीवनाचीं सारीं रहस्यें अगदीं बालपणीं देखील आकलन करूं शकतो. खलील जिब्रानला अशी प्रतिभा बालपणींच लाभलेली दिसते. ही प्रतिभाशक्ति तार्किक बुद्धीहून भिन्न आहे. मानवी जीवनाचें अंतःस्वरूप केवळ भौतिकशास्त्रानें संपूर्णपणें उलगडणार नाहीं. तें अंतःशक्तीनेंच अखेर जाणतां येईल. महाकवीची प्रतिभा म्हणजे मानवी मनाची ही गूढ अंतःशक्तिच होय. या अंतःशक्तीचा भौतिक शक्तीशीं विरोध मानण्याचें कारण नाहीं. सारें जीवन हें तत्त्वतः एकच समजलें पाहिजे आणि भौतिक विश्व हा आत्मिक शक्तीचा विकास अथवा विलास मानला पाहिजे. अंतःस्वरूपांत लपलेली एकता बाह्य स्वरूपांतील विविधतेंतहि अखेर प्रत्ययाला यावयाची आहे. जीवनाच्या अंतःस्वरूपांतच जीवनाचीं सारीं मूल्यें बीजरूपानें वसत असतात. या मूल्यांचा साक्षात्कार कलावंतांना त्यांच्या प्रतिभाशक्तीनें होतो. या मूल्यांची सामाजिक व्यवहारांत प्रस्थापना करण्याचें काम भौतिक विज्ञानाचें आहे. त्या विज्ञानाला प्रेरक आणि प्रोत्साहक अशी कवीची प्रतिभा होऊं शकते. प्रतिभा आणि विज्ञान यांचा हा परस्परसंबंध नीट जाणला असतां कलावंतांचें जीवनविकासांत कोणतें कार्य असतें हें स्पष्ट दिसून येईल. खलील जिब्राननें आपल्या थोर प्रतिभेनें अरबी भाषा बोलणाऱ्या महान् लोकसमूहाला अलीकडच्या काळांत सामाजिक विकासाची थोर प्रेरणा दिलेली आहे.

"खलील जिब्रान याची भूमिका प्रारंभापासून अखेरपर्यंत सौंदर्योपासक कलावंताचीच होती. प्रत्यक्ष राजकीय उलाढालींत तो कधींच पडला नाहीं. त्याच्या कलेसाठींच त्याला त्याच्या चर्चनें बहिष्कृत केलें होतें. त्याच्या कलेसाठींच तुर्की साम्राज्यसत्तेनें त्याला मायदेशांतून हद्दपार केलें होतें. तो सौंदर्यदर्शी कलावंत होता हें खरें; पण त्याच्या सौंदर्याची कल्पना मोहकतेला भेदून जीवनाच्या सत्स्वरूपापर्यंत पोहोंचलेली आहे. तो म्हणतो : 'माझ्या अंतरात्म्यानें मला सावध केलें आणि मला शिकवण दिली कीं रूप आणि रंग यांच्या पड्याआड दडलेलें सौंदर्य तूं शोधून काढ. होय, माझ्या अंतरात्म्यानें मला अगदीं बजावून सांगितलें कीं, जी जी वस्तु कुरूप व असुंदर समजली जाते ती ती सुस्वरूप व सुंदर दिसूं लागेपर्यंत तूं तिच्याकडे टक लावून पाहा. जोंपर्यंत माझ्या अंतरात्म्यानें मला अशी

शिकवण व प्रेरणा दिली नव्हती तोंपर्यंत मला सौंदर्य हें धुराच्या लोटांमधून थरथरणाऱ्या दीपशिखेप्रमाणें भासत होतें. परंतु आतां धूर नाहींसा झाला आहे आणि मला ज्योतीशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. ' ... जीवनाच्या सौंदर्यदर्शनानें हृदयांतील आसक्ति गळून गेल्यामुळें, जिब्रानच्या जीवनांत प्रेमाला कायमची वस्ती करतां आली. जिब्रान हा आधुनिक काळांतील थोर मानवतावादी कलावंत होऊन गेला. त्याचें मानवप्रेम कोठल्याहि मर्यादांनीं मर्यादित होऊं शकलें नाहीं. तो विश्वाचा नागरिक बनला. पण विश्वप्रेमाच्या धुंदींत त्याला सामाजिक अन्यायांचा विसर पडला नाहीं. विश्वप्रेमानें त्याला सर्वांगीण क्रांतिकारक बनविलें."

## गोमटेश्वर बाहुबली

म्हैसूर राज्यांतील श्रवणबेळगोळा गांवानजीक हिंदुस्थानांतील एक आश्चर्य मूर्तिरूपानें उभें आहे. ती मूर्ति प्रसिद्ध जैन साधु गोमटेश्वर बाहुबली याचा अजस्र पुतळा होय. दर बारा वर्षांनीं या मूर्तीवर महामस्तकाभिषेक करण्यांत येतो. यंदा तसा अभिषेक नुकताच ५ मार्चला झाला. जगांत या मूर्तीहून प्राचीन असलेल्या मूर्ति सांपडतात. पण या मूर्तीइतकी विशाल, विराट्, सुंदर मूर्ति दुसरी सांपडणें विरळाच. गोमटेश्वराची प्रतिष्ठापना २३ मार्च १०२८ ला झाली असावी. संस्कृतांत गोम्मट म्हणजे मन्मथ-मदन असा अर्थ आहे. त्यावरून हें नांव पडलें असावें. याच भव्य मूर्तीजवळ सर्वांत जुना मराठी शिलालेख आहे व त्यांत हें मूर्तिकाम 'चामुंडरायें करवियलें' असें वाक्य मराठींत आहे. उपलब्ध शिलालेखांतील हें पहिलें मराठी वाक्य होय.

सोलापूर येथें निघणाऱ्या 'सन्मति' या मासिकानें एक भगवान् गोमटेश्वर ( जानेवारी-फेब्रुवारी संयुक्त ) विशेषांक काढला आहे. त्यांत अनेक विद्वान् अधिकारी लेखकांचे लेख आले असून, त्यांमधून गोम्मटेश्वरांचें विविध सुंदर दर्शन घडून येतें. त्या अंकांत धारवाडच्या कर्नाटक रिसर्च इन्स्टिट्यूटचे प्रा. बी. एस्. कुलकर्णी यांनीं भगवान् बाहुबलीचा चरित्र-परिचय कन्नड वाङ्मयांतील आदिकवि पंप ( इ. स. ९४१ ) यांच्या आदिपुराणाच्या आधारें करून दिलें आहे. त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे. त्यावरून बाहुबलीची मूळ प्राचीन कथा लक्षांत येते.

" भरत आणि बाहुबली या दोघांनाहि त्यांचे वडील ऋषभदेव आदिदेव यांनीं समान दर्जानें वागविलें. दीक्षाग्रहणाच्या वेळीं आदिदेवांनीं आपलें राज्य विभागून आपल्या सर्व मुलांना वांटून दिलें. भरत हा अयोध्येचा सम्राट् झाला आणि पोदनपुरावर बाहुबली अधिराज्य गाजवूं लागला. आयुधशाळेंतील चक्ररत्न लाभल्यामुळें भरत जग जिंकण्यास बाहेर पडला. जग पादाक्रांत करून जेव्हां तो अयोध्येस परत आला त्या वेळीं सुदर्शन-चक्राचा प्रवेश वेशींतून आंत शहरांत होईनासा झाला. चौकशीअंतीं असें कळून आलें कीं, भरताचें आधिपत्य अमान्य करणारे अजूनहि कांहीं राजे अस्तित्वांत आहेत. ते म्हणजे दुसरे-तिसरे कोणी नसून त्याचे भाऊच होते. भरताचें प्रभुत्व मान्य करण्यास त्यांना आज्ञा करण्यांत आली. भरताची आज्ञा मानण्याचा प्रश्न जेव्हां उपस्थित झाला त्या वेळीं मात्र बाहुबलीनें नापसंती व्यक्त केली. बाहुबलीनें सांगितलें कीं, त्याला लाभलेलें राज्य हें त्याच्या वाडवडिलांपासून मिळालें आहे, म्हणून त्यावर भरताला प्रभुत्व गाजवितां येणार नाहीं. म्हणून बाहुबलीनें भरतास आव्हान दिलें....युद्धाचे प्रकार म्हणून दृष्टियुद्ध, जलयुद्ध आणि मल्लयुद्ध हे ठरविण्यांत आले. बाहुबली हा भरतापेक्षां बळकट आणि उंच होता. म्हणून अगदीं लीलेनें त्यानें भरताचा तिन्ही युद्धांत पराजय केला. विशेषतः मल्लयुद्धांत तर त्यानें भरतास उचलून त्याला वर आकाशांत धरलें. त्याला जमिनीवर आदळून त्याचा कपाळमोक्ष घडवून आणण्याचा विचारहि बाहुबलीच्या डोक्यांत आला. परंतु नंतर त्याला सुचलें, 'अरे ! हा तर माझा वडिल भाऊ. वडिलकीचें नातें त्याच्याकडेच आहे. तो सम्राट् आहे आणि कीर्तिमान् आहे. त्याला खालीं पाडून त्याचा अपमान करतां कामा नये.' असा विचार करून








त्यानें त्याला जमिनीवर अलगद् ठेवलें. याची भरतावर मात्र विपरीत प्रतिक्रिया झाली. सर्व सैन्या-समक्ष आणि सगळ्या राजांदेखत झालेल्या आपल्या अपमानानें तो चिडून गेला. 'बाहुबलीचा उच्छेद कर' म्हणून त्यानें सुदर्शनचक्रास आज्ञा केली. पण त्या चक्रानें बाहुबलीस कोणतीच इजा केली नाहीं! तें त्याच्याजवळ जाऊन, त्याच्या उजव्या बाजूकडे जाऊन स्थिर झालें! चक्ररत्नानें बाहुबलीला कोणतीच इजा झाली नाहीं हें पाहून आणि आपण केलें तें पूर्ण अयोग्य केलें याची जाणीव होऊन भरत शरमिंधा झाला. त्यानें आपलें मस्तक खालीं झुकविलें. भरताच्या या कृत्याचा बाहुबलीवर अगदीं निराळा परिणाम झाला. त्यानें विचार केला, 'भरतानें—माझ्या भावानें-माझ्यावर चक्ररत्न सोडलें. भरतासारखा सम्राट् देखील राज्यतृष्णेमुळें अशा प्रकारचें कृत्य करूं शकतो तर मग इतर राजांची काय कथा? राज्यावरील या लालसेमुळेंच भाऊ भावाशीं भांडतो, मुलगा आपल्या बापाशीं झगडतो. राज्य-वृद्धीची आणि राज्याची तृष्णा म्हणजे अधोगतीचा आंखीव मार्ग होय!' वरील विचाराचाच परिणाम होऊन बाहुबलीनें चंचल राज्यसौख्याचा त्याग केला. राज्य सोडून संन्यास धारण करण्याचें निश्चित ठरवून तो आपल्या भावास म्हणाला, 'चक्ररत्नाच्या साह्यानें माझ्यावर तुला सत्ता गाजवावयाची आहे, पण हिऱ्याच्या एका तुकड्यानें हिऱ्यांच्या राशीची प्राप्ति होते काय? क्षमा कर, दादा! ज्या पृथ्वीवर तुझा डोळा आहे, ती पृथ्वी मला नको! माझें हें राज्य घे. त्याचा तूं आनन्दानें उपभोग घे. त्याचा त्याग करून मी संन्यासी होईन!' आपल्या भावानें संन्यास घेऊं नये म्हणून भरतानें आटोकाट प्रयत्न केला. पण खंबीर वृत्तीच्या बाहुबलीला त्याचें काय? शेवटीं त्यानें आपल्या वडिलांजवळ—आदिदेवांजवळ दीक्षा घेतलीच. मध्यंतरींच्या काळांत खडतर तपश्चर्या करून त्यानें केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली."

## गुर्जर कथाकार श्री. पन्नालाल पटेल

गुजरातींतील नव्या पिढाच्या लघुकथा-लेखकांत व कादंबरीकारांत श्री. पन्नालाल पटेल यांचें स्थान फार उच्च आहे. दरवर्षीं गुजराती साहित्यसंमेलना-तर्फे कोणा तरी श्रेष्ठ कलावंत साहित्यिकाला देण्यांत येणारें 'रणजितराय सुवर्णचंद्रक' नांवाचें सुवर्णपदक यंदा **श्री. पन्नालाल पटेल** यांना द्यावयाचें ठरलें आहे. आनंदाची गोष्ट ही कीं, श्री. पन्नालाल हे नुकतेच मोठ्या आजारांतून सुखरूप उठले आहेत. अशा वेळीं गुजराती साहित्यप्रेमी जनता विशेष उत्साहानें या तरुण साहित्यिकाचा सत्कार करण्यास तयार झाली आहे. या प्रसंगानें ह्या तरुण कथाकाराच्या साहित्यिक श्रेष्ठतेविषयींची एक टिपणी गुजरातचे सिद्धहस्त शैलीकार श्री. किसनसिंग चावडा ('संस्कृति' मासिकांतील 'जिप्सी') यांनीं खास 'नवभारता'साठीं लिहिली आहे. तिचा अनुवाद पुढें दिला आहे:

"गुजराती साहित्यांत 'रणजितराय सुवर्ण-चंद्रका'चें महत्त्व फार आहे. त्यामुळें तें पदक ज्या कोणा कवि, कलाकार किंवा वाङ्मयसेवकाला मिळावयाचें असेल त्याच्या जीवनाची विशिष्टता व त्याच्या सृजनशील प्रतिभेचें तेज यांविषयीं कांहीं तरी कळून घेण्याची उत्सुकता सहजीं उत्पन्न होते. या वेळीं वरील पदक गुजरातचे लाडके लघुकथा-लेखक श्री. पन्नालाल पटेल यांना देण्यांत आलें आहे. त्यांचें नांव गुजराती साहित्यांत केवळ परिचित आहे एवढेंच नव्हे, तर तें प्रिय बनलेलें आहे. गुजरात व राजस्थान यांच्या सरहद्दीवरचें 'मांडली' नांवाचें खेडेगांव श्री. पन्नालालजींचें मूळ गांव आहे. श्री. उमाशंकर जोशींच्या शब्दांत म्हणावयाचें तर 'मांडली' हें खऱ्या अर्थानें खेडें आहे, याविषयीं चूक होऊं शकणार नाहीं. हीच उक्ति वापरून असें म्हणतां येईल कीं, श्री. पन्नालाल खऱ्या अर्थानें कथाकार आहेत याबद्दलहि चूक होण्यासारखी नाहीं.

"'मळेलां जीव' आणि 'मानवीनी भवाई' (मानवाचें ललित) या त्यांच्या सुप्रसिद्ध कथनपर कृती आहेत. या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या तेव्हां गुजराती कथासाहित्याच्या वातावरणांत पहिल्या पावसानें दरवळणारा मातीचा सुगंध जिकडे तिकडे पसरला. त्यांच्या कादंबऱ्या व त्यांच्या लघुकथा










यांचें हेंच विशिष्ट सौंदर्यतत्त्व आहे. त्यांत धरित्रीचा तजेला, वीर्य आणि मानवता हीं ठासून भरलीं आहेत. श्री. पन्नालाल साहित्याक्षितिजावर उगवण्यापूर्वीं ग्रामीण लोकबोलीची ताकद व तजेला यांबद्दल जरासें नाक मुरडण्यांत येत असे. पण श्री. पन्नालाल यांनीं तिचा अशा कलात्मक रीतीनें उपयोग केला कीं त्यांतून एक वीर्यवती शैली जन्म पावली. वास्तविकतेवरील स्वाभाविक प्रभुत्व आणि त्याबरोबरच त्यांतील काव्यसौंदर्याचें रसायन हे अनुपम गुण त्यांत होते. या सर्व कृतींमध्यें सृजनलीलेचा असा कांहीं स्वाभाविक थाट उडून जातो कीं, वाचकाच्या अंतःकरणांत मानवाविषयीं कारुण्य उचंबळून यावें.

" गुजराती ' नवलकथे 'च्या ( कादंबरीच्या ) विकासांत ' सरस्वतीचंद्र ' कर्ते श्री. गोवर्धनराम त्रिपाठींच्या नंतर ' गुजरातनो नाथ 'चे कर्ते श्री. कनय्यालाल मुनशी यांचें नांव येतें आणि त्यानंतर ' भारेला अग्नि ' चे लेखक श्री. रमणलाल वसंतलाल देसाई यांचें नांव निःसंकोचपणें घ्यावें लागतें. याप्रमाणेंच श्री. रमणलाल देसाईनंतर कोणतें नांव घ्यावें तें कळत नव्हतें. आज तें नांव सांगावयाचें झाल्यास श्री. पन्नालाल पटेल यांचें नांव गुजरातपाशीं आहे.

" कथानकाचें सुसूत्र, सुघटित संकलन, त्याचा विकास व त्याचा शेवट हें सर्व अतिशय सहज रीतीनें साधून, सबंध कृति सृजनाच्या सौंदर्यानें मढवून, त्यांतून श्री. पन्नालालांची प्रतिभा नखशिखांत संपूर्ण अशी साहित्यकृति निर्माण करते."

**गायकरत्न कै. सुरेशबाबू माने**

श्री. सुरेशबाबू माने नुकतेच आपल्यांतून हरपले ! त्यांच्या गायनांतील व नाटकांतील कामगिरीचें दिग्दर्शन करणारा एक लेख ' भारतज्योति '- ( ८ मार्च ) मध्यें श्री. यशवंत पर्वते यांनीं लिहिला आहे. त्यांतून कांहीं भाग येथें दिला आहे :

" कै. सुरेशबाबू हे खान अबदुल करीमखां यांचे ज्येष्ठ चिरंजीव. यांच्या मरणानें करीमखांच्या किराणा घराण्याचें फारच नुकसान झालें आहे. श्री. सवाई गंधर्व यांच्या निधनानें या घराण्यांत जी पोकळी निर्माण झाली ती सुरेशबाबूंच्या निधनानें उलट वाढलीच आहे. अर्थातच रोशनआरा बेगम, गंगूबाई हनगल, कपिलेश्वरीबुवा व बेहेरेबुवा यांच्यासारखे गायक अजून ती गायकी टिकवीत आहेतच. बापलेक दोघेहि पन्नाशीच्या सुमारास हृदयक्रिया बंद पडून मरण पावले !

" सुरेशबाबूंना संगीताची तालीम वडिलांजवळ मिळाली. त्यांचा आवाजहि धारदार, खडा आणि मधुर होता. त्यांची प्रतिभाहि वाखाणण्यासारखी होती. ' देवयानी ', ' सच है ', ' अमृतमंथन ', ' चंद्रसेना ', ' नंदकुमार ' वगैरे चित्रपटांच्या संगीत दिग्दर्शनांत त्यांच्या या गुणाचा प्रत्यय लोकांना आलाच आहे. वाद्यें वाजविण्यांत सुरेशबाबूंचा हात तयार होता. विशेषतः तबला व दिलरुबा यांची त्यांची तयारी अप्रतिम होती. शिवाय दुसऱ्या भिन्न गायकीच्या उस्तादांची नक्कल सहीसही करण्याचें कसब त्यांच्यांत होतें. त्यामुळें त्यांची मैफल हटकून रंगत असे. बडे गुलामअली, पटवर्धनबुवा किंवा म. फैय्याझखां, वझेबुवा वगैरेंची गायकी ते तयारीनें गात.

" सुरेशबाबूंच्या चतुरस्त्रतेची कोणाला विशेष कल्पना नाहीं. पण ते उत्कृष्ट पाकशास्त्रज्ञ होते व वैद्यकी ते उत्तम जाणत व लोकांना त्याचा उपयोगहि होत असे. रुग्णाइतांचें औषधपाणी करण्यांत त्यांना विशेष आनंद होत असे.

" ते तयार संगीतकाराप्रमाणेंच उत्तम संगीतशिक्षकहि होते. हिराबाईंना प्रथम त्यांनींच तालीम दिली. खांसाहेबांनीं ती केव्हांहि दिलेली नव्हती. नंतर माणिक वर्मा, मेनका शिरोडकर, वामनराव व वसंतराव देशपांडे व प्रभा अत्रे वगैरे शिष्यमंडळी त्यांचें नांव गाजवीत आहेतच.

" त्यांच्या नाटक-सिनेमांतील कामगिरीचा उल्लेखहि केला पाहिजे. ' सौभद्रां 'तील अर्जुनाची किंवा कृष्णाची भूमिका, ' एकच प्याल्यां '-तील रामलाल, ' विद्याहरणां 'तील कच, तसेंच ' अमृतमंथन ', 'राजपूतरमणी' व 'देवयानी' चित्रपटांतील त्यांचीं कामें लोकांना अजूनहि आठवतात.

" त्यांच्या प्रसिद्ध ठुमऱ्या-' बाजुबंद '( भैरवी ), ' नाही चैन ', ' रंग देख लियो ललचाये ' यांतील स्वर अजूनहि कानांत घुमत आहेत. ' "










Regd. No. B. 5177